# पांच पाहुण्या

जॉन स्टाइनबेक

जेम्स थर्बर

जॅक लंडन

मार्जोरी कीनन रॉलिंग्ज

हॉर्टेन्स कॅलिशर

**यांच्या पांच वेंचक कथा**

अनुवाद : **विजय तेंडुलकर**

**किंमत : दोन रुपये**

**न व - ले ख न**

मुद्रक :
श. कृ. सापळे,
रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस,
मोरबाग रोड, दादर, मुंबई १४.

प्रकाशक :
वसंतकुमार सराफ,
नवलेखन,
५ ई, मॉडेल हाउस,
प्रॉक्टर रोड, मुंबई ४.

# तुम्हांला कथालेखक व्हायचें आहे ?

पुष्कळाजवळ सागण्यासारख्या कितीतरी गोष्टी असतात. पण फार थोड्याना त्या परिणामकारकपणें सागता–लिहिता येतात. असें का होतें ?

चागली गोष्ट सागणें, लिहिणें खरेंच फार अवघड आहे का ? गोष्ट सागण्याचें, लिहिण्याचें एखादें गुतागुतीचें तत्र आहे काय ?

तसें म्हटले तर तंत्र आहे. एकाहून अधिक तत्रें आहेत. त्यावर पुस्तकेंदेखील लिहिण्यात आलीं आहेत, लिहिलीं जात आहेत. परतु ही पुस्तकें वाचून कुणी चागल्या कथा लिहू शकलें नाहीं, शकणार नाही या संग्रहातल्या पाचहि कसबी आणि यशस्वी कथालेखक–लेखिकानी पुस्तकी तत्राचा अवलब आपल्या कथातून केलेला नाहीं. एरवीं पाचहि कथा एकाच साच्यातल्या भासल्या असत्या. या पाच कथाचें चागुलपण त्यातल्या प्रत्येकीच्या वेगळेपणात आणि स्वतत्र घाटातच अधिक आहे. तुम्हाला चागला कथाकार व्हायचें असेल तर तुमच्या कथा इतर कुणाच्याहि कथासारख्या नसणें फार महत्त्वाचें आहे. त्या तुमच्याच वाटल्या पाहिजेत. त्यातला वर्ण्य अनुभव, तो अनुभव ग्रहण करणारे मनःचक्षू, तो प्रकट करणारी प्रतिभा, आणि पर्यायानें तो प्रकट करण्याची पद्धत तुमची स्वतत्र असणें आवश्यक आहे. जगातल्या साऱ्या लोकोत्तर कथाकारानीं स्वतःसारखें लिहिलें, अन्य कुणाचेंहि अनुकरण केलें नाही.

चागल्या कथाकाराला त्याचा स्वतंत्र साचा हवा तसा चागल्या कथेला–गोष्टीला–तिचा स्वतत्र घाट हवा. एक चागली कथा दुसऱ्या चागल्या कथेसारखी असूंच शकत नाहीं. यासाठीं कथाकारानें आपल्या वर्ण्य अनुभवाशीं कमालीचें इमान राखलें पाहिजे. त्याचा अस्सलपणा,

रसरशीतपणा, क्वचित् ओबडधोबडपणादेखील त्यानें जपला पाहिजे, आपल्या कथेमध्यें परिश्रमपूर्वक उतरविला पाहिजे. कथेचें यश जसें तिच्या स्वतत्र घाटात तसेंच तें तिच्यातल्या अनुभवाच्या अस्सलपणातदेखील असते या सग्रहातल्या काही गोष्टीना बाधीवपणा तेवढासा नाहीं, गोळीबंद शैली नाहीं, स्वभावरेखन काहीसें अस्पष्ट आहे, तरीहि त्या वाचनीय आणि परिणाम करणाऱ्या आहेत, त्या त्याच्यातील अनुभवाच्या अस्सलपणावरच. हा अस्सलपणा हवा असेल तर कथालेखकानें डोळसपणें जीवन जगलें पाहिजे, त्यावर चिंतन केलें पाहिजे. अनुभव त्याच्या वरवरच्या तपशिलानिशीं कागदावर न उतरविता, ते मुरू दिले पाहिजेत. घेतलेले अनुभव मनानें चागले पचाविल्याशिवाय सकस लेखन निर्माण होऊंच शकत नाहीं.

या सग्रहातल्या पाच गोष्टी या दृष्टीनें उत्तम मार्गदर्शन करूं शकतील.

* * *

# मार्जोरि कीनन रॉलिंग्ज :

अमेरिकेतल्या विख्यात लेखिका. अनेक कादबऱ्या आणि लघुकथा याच्या लेखणीतून उतरून गाजल्या आहेत. १८९६ मध्ये जन्म वडील पेटट–ॲटर्नींचा व्यवसाय करीत. विस्कॉन्सिन विश्वविद्यालयाची पदवी बाईंनी १९१८ मध्ये सपादन केली. त्यानतर यगमेन्स ख्रिश्चन असोसिएशनसाठी प्रसिद्धि–प्रमुख म्हणून त्यांनी काही वर्षे काम केले. लुइसव्हिलच्या 'कोरिअर–जर्नल 'मार्टी विशेप प्रकारचे नैमित्तिक लेखन केले १९२५ ते १९२७ या दरम्यान काव्यरचनाहि विपुल केली. १९२८ मध्ये पत्रव्यवसाय सोडून फ्लॉरिडातल्या होथॉर्न गांवी क्रास क्रीकला सत्र्याची मोठी बाग खरेदी केली आणि तिथेच वास्तव्य ठेवून कथालेखनाला आरभ केला परतु त्याच्या आरभीच्या अनेक कथा 'साभार परत'चे शिक्के खाऊन परत आल्या. १९३३ मध्ये 'गाल यग अन' नावाच्या त्याच्या एका कथेला ओ–हेन्री–स्मारक–पारितोपिक मिळाले आणि मग मात्र त्याच्या कथाना मागणी निर्माण झाली त्याच वर्षी बाईंची पहिली कादबरी 'साउथ मून अडर' प्रासिद्ध झाली आणि गाजली. फ्लॉरिडातल्या बारा वर्षाच्या एका मुलावर त्यांनी यानतर लिहिलेली 'इयर्लिंग' ही कादबरी १९३९ मध्ये अमेरिकेतल्या बहुमानदर्शक पुलिट्झर पारितोषिकाला पात्र ठरली १९४२ मध्यें त्यांनी 'क्रॉस क्रीक' ही कादबरी लिहिली तिचेहि उत्तम स्वागत झाले बाईंची शेवटची कादबरी, 'सोजर्नर' नावाची, त्याच्या आजोबाच्या काळावर आधारलेली होती. १९५३ मध्ये बाई निवर्तल्या. 'अ मदर इन् मॅनव्हिल' ही त्याच्या लेखणीतून उतरलेली प्रस्तुतची हृदयस्पर्शी कथा १९३६ च्या सुमारास लिहिलेली असून अमेरिकन कथासाहित्याचें भूपण ठरलेली आहे.

त्या
ची
आ
ई




तें अनाथालय आहे खूप उचावर, करोलिना डोंगरावर हिवाळयात बर्फाच्या एवढ्या मोठ्या नद्या या डोंगरातून वहातात की खालच्या गावापासून, एकूण जगापासूनच ते तुटून पार वेगळ पडत, एकाकी होत धुक्यात डोंगरमाथे दिसेनासे होतात, बर्फाचे सुळकेच्या सुळके डोंगरकपारीतून धो धो खाली धावू लागतात आणि वारा तर असा बर्फगार सुटतो, की अनाथालयातल्या छोट्या अर्भकाच्या झोपडी पर्यंत दिवसातन दोनदा दुधाच्या बाटल्या घेऊन जाणाऱ्या बिचाऱ्या मुलाची झोपडीच्या दाराशी पोचेपर्यंत अगदीं बोबडी वळते आणि थडीन हाताची बोट ताठ होतात.

" किवा ", जेरी म्हणाला होता तस, " आजारी मुलासाठी भटारखान्यातून जेवणाचे टे घेऊन जायच म्हणजे वाटेत चेहऱ्याच लाकूड होत नुसत. कारण हात ट्रे धरण्यात गुतलेले असतात, तोंड चोळायच म्हटल तर हात तरी रिकामा हवा ना! तरी बर, माझ्याकडे हातमोजे आहेत. काही मुलाकडे तेदेखील नाहीत."

जेरीला वसताचा ऐन बहर फार आवडतो अस तो म्हणाला होता डोंगराच्या कुशीवर '-होडोडेण्ड्रॉन' या दिवसात मखमली गालिचासारखे नुसते फुलून येतात. मद वाऱ्यावर त्याचे शेंडे एकसाथ झुलू लागले म्हणजे तर विचारूच नका! त्याच्याबरोबर काळीज नुसत हेलावून जात. जेरी -होडोडेण्ड्रॉनला 'लॉरेल' म्हणे. इतक्या सुदर गोष्टीला अस ओबड-धोबड आणि रुक्ष नाव त्याला जणू आवडत नसे, म्हणून हे नव नाव त्यान ठेवल होत. तो म्हणे, "लॉरेल बहरतान तेव्हा त्याची शोभा अगदी विचारूच नका. कुठे गुलाबी, कुठे पाढरा शुभ्र, असे त्याचे रग एकमेकाशी जसे लपंडाव खेळत रहातात बघा"

मी तिथ होतें ते ऐन शरदाचे दिवस. महत्त्वाच काही लेखन करण्यासाठी एकात हवा होता, शातता हवी होती. शिवाय मलेरियान बुजबुजलेल्या उष्ण हवेत उबलेला जीव डोगराळ उघड्या हवेंत जरा खुलला असता. आणि खर म्हणजे बालपणापासून ज्यात मी वावरले, वाढले, तो ऑक्टोबरमधला मेपल्सचा लालबुद बहर, शेतातल्या दाण्यानी भरलेल्या लोंब्या, झालच तर ते भोपळ्याचे वेल, काळ्या वॉलनटची झाड, आणि टेकड्याचे चढ याची तहान मला आत आत कुठ तरी लागून राहिली होती आणि हे सर्व मला अनाथालयाच्या मालकीच्या वाडीपासून अर्ध्या–एक मैलावरच्या अनाथालयाच्याच मालकीच्या एका घरकुलात सापडल. रहायला आले तेव्हा शेकोटीसाठी लाकूडफाटा फोडण्याकरता कुणी मुलगा किवा माणूस पाठवा म्हणून मी चालकाना कळवल होत पण पहिले काही दिवस तसे विशेष थडीचे नव्हते, शिवाय गरजेपुरत जळण मला आसपास सापडत होत. त्यामुळे या कामासाठी माणूस हवा, किंवा मी मागवलाहि आहे, हे मुळी मी विसरूनच गेलें, आणि कोणी आलहि नाही.

एकदा दोन प्रहरी टाइपरायटर घेऊन मी कामाला बसले ती चागली दुपार उलटली तरी उठले नाही. मध्येंच कुणी आलं या भासान दाराकडे

पाहिल,तो दाराशी एक पोरगा उभा होता. माझी सगत करणारा माझा कुत्रा पॅट् त्याच्या शेजारीच उभा राहून खुषीत शेपटी हालवीत होता. नेहमीप्रमाण, कुणी आलय् याची सूचना भुकून त्यान मला दिली नव्हती. तो पोर असेल बाराएक वर्षाचा पण त्या मानान दिसत मात्र होता लहान, त्याची चण लहान होती, त्यात अगावर फारस मासहि नव्हत त्याच्या अगावर एक चिरगुट आणि त्याखाली एक फाटका शर्ट होता तो अनवाणीच होता

माझ लक्ष गेल तशी तो म्हणाला, ' जळणाला लाकूड हव तर थोडस फोडून देतो "

मी म्हणाले, "पण अनाथालयातून एक मुलगा मी त्यासाठी मागवलाय् "

मीच तो." तो म्हणाला

' तू ? तू तर फार लहान दिसतोस "

"त्याच काही नाही." तो म्हणाला, ' लहान असेना का, लाकूड कस फोडून देतो पहा उलट मोठ्यामोठ्या मुलाना जमत नाही चागल लाकूड फोडण इथ अनाथालयात मीच तर हे काम पुष्कळ दिवस करतोय् "

या हाडकुळ्या, अशक्त मुलान कसबस फोडून ठेवलेल वेडवाकड, अपुर जळण माझ्या कल्पनेत क्षणभर आल. पण मन कामात पुरेपूर गुतल होत आणि बोलण जास्त वाढवण्याची इच्छा नव्हती. जरा तुटकपणेच मी म्हणाले, "बरय्. तिकडे कुऱ्हाड आहे, ती घे नि कर काय करतोस ते "

दरवाजा लावून घेऊन मी पुन्हा कामात गढले. प्रथमप्रथम तो मुलगा जिवाच्या करारान अवजड फाद्या मोटमोठे आवाज करीत ओढीत नेत होता, त्याचा मला त्रास झाला. मग तो लाकड फोडू लागला. तो घाली

ते घाव एका धीम्या लयीत पडत होते, आणि ही लय चुकत नव्हती हळू-हळू मी त्याच अस्तित्वच विसरलें. बाहेर पाऊस अखंड धारानीं कोसळत असावा तशी मी त्याच्या त्या नियमित घावाना सरावले असा तास-दीड तास गेला असेल मी लिहिण थाबवल आणि अवघडल अग ताणून जरा आळस देते आहे, तो त्या पोराची पावल बाहेर वाजली. लाबच्या डोगरामागें सूर्य बुडी मारीत होता आणि सार आसमत नारिंगी रंगात न्हायल होत.

तो पोरगा म्हणाला, "बाई, मला आता भाकरतुकडा खायला जायला हव. उद्या सध्याकाळला हवा तर पुन्हा येतो."

मी म्हणाले, "आता केलयस त्या कामाचे पैसे अगोदर मी तुला देऊन टाकते, थाब" हेतु हा की, उद्या याच्यापेक्षा जरा मोठा मुलगा पाठवायला साांगाव. "काय घेणार तू? तासाला दहा सेंट?"

"द्या तुमच्या खुषीन."

आम्ही दोघ घरामाग गेलो. पुष्कळस जळण तिथ व्यवस्थित फोडून नेटक रचून ठेवलेल होत. तेदेखील चेरी, ऱ्होडोडेण्ड्रॉन, पाइन, ओक अस अवजड, भरीव लाकडाच. पाइन आणि ओकचा थोडासा लाकूडफाटा घर बाधून शिल्लक उरला तो अगणात पडलेलाच होता

मी जरा चाकितच होऊन म्हणाले, "तू तर एखाद्या बाप्यासारखं काम करून ठेवलयस! फार छान जळण फोडलयस तू"

आता प्रथमच मी त्याला जरा लक्षपूर्वक न्याहाळून पहात होते. त्याचे केस गव्हाळी रगाचे होते. डोळे टपोरे होते आणि त्यात पावसाळी कुद आभाळाची गडद निळाई होती. माझ्या कौतुकाच्या शब्दानी त्याची मुद्रा एकदम उजळली. जणू डोगराच्या कडाना रुपेरी शोभा देणाऱ्या मावळतीच्या सूर्यानंच त्याच्या त्या मुद्रेला हलुवार स्पर्श केला. मी त्याच्या हातांत क्वार्टरच नाणं ठेवलं. म्हटल, "उद्या ये पुन्हा. माझ मोठं काम केलस बघ तू."

त्यान माझ्याकडे पाहिल, हातातल्या नाण्याकडे पाहिल. त्याला काहीतरी बोलायच होत, पण ते त्याला जमत नव्हत. तसाच तो जाण्यासाठी वळला.

"उद्या बारीक लाकूड फोडून देतो तुम्हाला जळणासाठी मोठ लाकूड लागेल आणि तें पेटवायला लहानलहान लाकूड." तो जाता-जाता, आपल्या हाडकुळ्या खांद्यावरून मुरडून माझ्याकडे पाहून म्हणाला.

दुसऱ्या दिवशी उजाडताउजाडताच मला लाकूड फोडण्याच्या आवाजानी अर्धवट जाग आली. हे आवाज पुन्हा एवढे लयबद्ध होते की, तशीच परत मी गाढ झोपी गेले. मग उठले तेव्हा तो पोर येऊन गेला-देखील होता. परसात जळणाची लाकड व्यवस्थित हारीत नेटकी रचून ठेवलेली होती दोन प्रहरी शाळा सुटल्यावर तो पुन्हा आला आणि मग अनाथालयात परत जाण्याची वेळ होईपर्यंत तो काम करीत होता. त्याच नाव होत जेरी, वयान बाराएक वर्षाचा होता आणि अगदी चार वर्षाचा असल्यापासून त्या अनाथालयातच वाढला होता. चार वर्षाचा तिथ तो आला तेव्हा कसा दिसत असेल याच चित्र कल्पनेन मी रगवून पाहिल. तेच ते गडद निळे, गांभीर्यांन अकाली भरलेले डोळे. तोच— स्वयभूपणा ? नव्हे, मला अभिप्रेत आहे– 'कर्तेपणा'

या शब्दाला माझ्या लेखी एक विशेष अर्थ आहे ज्या गुणासाठी मी तो वापरते तो गुण दुर्मिळ आहे.माझ्या वडिलामध्ये तो होता,परतु डोंगराच्या गर्भातून खळखळ वहाणाऱ्या एखाद्या झऱ्याच्या विशुद्ध, साध्या आणि स्वच्छ स्वरूपात हा गुण माझ्या परिचयाच्या माणसात तरी मला जवळ-जवळ अभावानच जाणवत आला आहे. परतु जेरीमध्ये हा गुण या स्वरूपात होता. धैर्य, कर्तृत्व यात अभिप्रेत आहे, पण केवळ शौर्यधैर्यापेक्षा किंवा कर्तृत्वापेक्षा त्यात अधिक काही आहे. त्यात आत्मविश्वास आहे, पण निव्वळ तेवढाच नाही. एक दिवशी कुऱ्हाडीचा दाडा मोडला. जेरी म्हणाला,

'अनाथालयाच्या वर्कशॉपमधून तो दुरुस्त करून आणतो.' मी जाऊन त्यासाठी जेरीला द्यायला पैसे आणले, ते तो घेईना.

तो म्हणाला, " दादा मी मोडलाय् , पैसे मी देईन. कुऱ्हाड मी नीट वापरली नाही "

मी म्हणाले, " अरे, पण चुकत माणसाच एखादे वेळी. आणि दाड्याच लाकूडच कुजक, पिचलेल नसेल कशावरून ? मला तर वाटत, लाकडातच दोष होता. मी कुऱ्हाड विकत घेतली त्या माणसालाच जाऊन विचारणार आहे, असली कुऱ्हाड का माझ्या गळ्यात बाधलीन् तें. "

मगच जेरीन माझ्याकडून पैसे घेतले पण आपला निष्काळजीपणा त्यान अमान्य केला नाही. त्याचा तो मुखत्यार होता, काम व्यवस्थित करण्याच त्यान ठरवल होत त्यात हयगय झाली तर त्याची जिम्मेदारी कोणतीहि सबब न सागता तो स्वत.वर घेऊ इच्छित होता.

माझ्यासाठी तो जरूर नसना काही ना काही करू लागला, मला बर वाटेल अस करू लागला मोठ्या मनाची आणि दिलदार माणसच अशी वागतात. या गोष्टी शिकवून कुणाला येत नाहीत. कारण त्या उत्स्फूर्त असतात. आगापिछा नसता त्या होतात. पूर्वानुभवाची गरज त्याना नसते शेकोटीलगत जेरीन एक खळगा हेरला. माझ्या नजरेत तो आलाच नव्हता. तो खणून, रुद करून त्यात त्यान आपल्या मर्जीनच बारक्याबारक्या काटक्या, त्यातल्या त्यात लहान-लहान लाकूडफाटा रचला हेतु एवढाच की, एकाएकी हवेत गारठा आला, बर्फ आल, तर सुक जळण माझ्या सग्रही काही ना काही असाव. घराच्या ओबडधोबड दगडी वाटेवर एक दगड निखळलेला होता. त्या जागी जेरीन चागल खोल खणल आणि तो दगड त्यात पक्का बसवून टाकला. वास्तविक तो स्वत. यायचा एका जवळच्या आडवाटेनें. काही खाण्यापिण्याची वस्तु देऊन मी त्याच्या या श्रमाची परतफेड करू लागलें की तो मूकस्तभ व्हायचा. 'थॅंक यू 'सारख्या औपचारिक शब्दप्रयो-

गाचा त्याला उपयोग नव्हता, कारण त्याची कृतज्ञतादेखील उत्स्फूर्त आणि अकृत्रिम असे मी देई त्या वस्तूकडे आणि माझ्याकडे तो टकमका पाही आणि आमच्यातला एक पडदा जणू उचलला जाई. त्याच्या डोळ्याच्या नितळ डोहात खोलवर माझी नजर पोचू शके, आणि तिथ दिसायची कृतज्ञता, जिव्हाळा त्याच्या कणखर व्यक्तित्वावर या गोष्टी मधासारख्या साकळलेल्या वाटायच्या

पुढेपुढे माझ्याकडे यायला, माझ्याबरोबर गप्पा करायला जेरीला विशेष कारण लागेनास झाल केव्हाहि तो यायचा काहीतरी साध निमित्त काढून बसायचा आणि भुकेल्या माणसाला दारातून तसच्च परतवण जमू नये तस त्याला परतवण मला जमत नसे एकदा मी हळूच सुचवल की, सध्याकाळच्या जेवणाआधी आपण भेटत जाऊ या, तेव्हा माझ लिहिणहि सपलेल असत त्यानतर तो आला तरी सरळ आत येत नसे माझ्या टाइपरायटरचा आवाज बद पडला म्हणजे मग काही वेळ वाट पाहून तो यायचा एक दिवशी मी चागली रात्र पडेपर्यंत काम करीत बसले होते तो येईल याची आठवणच मला राहिली नाही काम थाबवून बाहेर फिरकले, तो मावळतीच्या प्रकाशात टेकडी चढून जेरी अनाथालयाकडे परत चालला होता पायरीवर टेकलें तेव्हा ती जागा त्याच्या पुष्कळ वेळ बसण्यान गरम झाली असल्याच्च आढळून आल.

माझ्या कुत्र्याशी तर त्याची जिगरजान दोस्ती जमली त्या वयाची मुल आणि कुत्री याच्यात एक विलक्षण ऋणानुबधच असतो. दोघातहि तोच एकाडेपणा, तीच जाण असल्यान असेल. नक्की का, कस, ते सागण कठीण आहे, पण असतो खरा एकदा एकदोन दिवसासाठी मी बाहेरगावी गेले. जाताना कुत्र्याला जेरीच्या ताब्यात देऊन गेलें. कुत्र्याची शिट्टी, घराची चावी आणि पुरेस खाणपिण अस सर्व जेरीला देऊन गेले. दिवसातून दोनतीनदा येऊन त्यान कुत्र्याला घराबाहेर सोडायच, त्याला खाऊपिऊ घालायच आणि त्याच्याकडून

शरीरमेहेनत करून घ्यायची अस आमच्यात ठरल. रविवारी रात्री मी परत यायची होते. रविवारी सध्याकाळी जेरीन कुत्र्याला शेवटच बाहेर काढून परत घरात बाधायच, कुलूप लावायच आणि चावी विशिष्ट ‘ गुप्त ’ जागी ठेवून द्यायची, असा सगळा तपशील पक्का ठरला.

योगायोगान माझ येण जरा लाबल, आणि डोंगरातून एवढ दाट धुक भरल की, रात्री मोटार घेऊन एकटीन येण्याचा धीरच मला झाला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळीहि धुक कायम होत. घरी परतायला सोम-वारची दुपार उजाडली. अखेर घरी परतले तेव्हा कुत्र्याला सकाळीच खाऊपिऊ घातलेल होत, त्याची उत्तम निगा राखलेली होती.

जेरी दोन प्रहरीच घाईगर्दीन आला.

म्हणाला, “आमचे सुपरिंटेडेट म्हणाले की, धुक्यात मोटारीन कुणी येऊच शकणार नाही. रात्री झोपण्याच्या आधी मुद्दाम इथ येऊन गेलो, तर तुम्ही आलेल्या नव्हतात. म्हणून सकाळी माझ्यातली थोडी न्याहारी घेऊन येऊन तुमच्या पॅट्ला खाऊ घातली. काही झाल तरी त्याला काही होता कामा नये होत.”

“ मला माहीत होत तू अस म्हणणार हे. म्हणूनच मी मुळीच चिता केली नाही.”

“ धुक पडलय् अस ऐकल तेव्हा मला पण वाटल की, मी आहे तेव्हा तुम्ही चिता करणार नाही ”

अनाथालयात त्याला काम होत म्हणून तो लागलीच पळत निघून गेला. जाण्याआधी त्याच्या हातात मी एक डॉलर मोबदला म्हणून ठेवला. त्यान त्याच्याकडे एकदा बघितल आणि गेला. पण रात्री अधारात तो परत आला आणि त्यान दार वाजवल.

मी म्हणालें, “ ये, आत ये, जेरी. पण इतक्या उशीरसर बाहेर रहायची परवानगी आहे का तुला ? ”

"नाही" तो म्हणाला, "मी जरास खोट बोललो. मी सांगितल की, तुमच माझ्याकडे काहीतरी काम आहे, म्हणून जाऊन येतो."

"ते खरच आहे." मी म्हणाले आणि त्याच्या मुद्रेवर एकदम सुटकेचा भाव उमटला "पॅटच नि तुझ कस काय जमल ते मला ऐकायचय्."

माझ्याबरोबर तो शेकोटीशी बसला. घरात दुसरा दिवा नव्हता. मधल्या दोन दिवसाची सारी हकीकत त्यान मला सविस्तर सांगितली. कुत्रा त्याला बिलगून बसला होता माझ्याकडून होत नव्हते ते लाड त्याचे जेरीकडून होत असल्यान तो फार सुखात होता. आणि मला असहि उमजून आल की, माझ्या कुत्र्याची काळजी वहात जेरीन काढलेल्या दोन दिवसात, जेरीतली आणि माझ्यातली जवळीकहि अजाणता दृढावली होती. कुत्र्याप्रमाणे मीहि त्याची आहे अस आता जेरीला मनात कुठ तरी निश्चितपणे वाटू लागल होत.

तो म्हणाला, "अहो बाई, पॅट् अगदी माझ्याबरोबर एकसारखा होता. 'लॅरेल'मध्ये तो एकटा जाई तेवढाच. त्याला तो भाग फार आवडायचा. मी त्याला टेकडीवर घेऊन जायचो. मग आम्ही दोघे खूप पळायचो.एका ठिकाणी गवत खूप उंच होत.तिथ मी आडवा निजून लपायचो, पॅट मला शोधायचा, मला चांगल ऐकू यायच तो शोधतोय् हे. मग माझा वास त्याला लागला की असा भुकायचा, असा भुकायचा, बाप रे! आणि मी सापडलो की वेडा व्हायचा जसा! गोल गोल पळायचा, उड्या मारायचा, हुदडायचा, भुकायचा फार मजा यायची!"

समोरच्या शेकोटीतल्या नारिंगी ज्वालाकडे आम्ही दोघानीहि टक लावली होती.

मग तो मध्येच म्हणाला, "मी सांगू का बाई? ते लाकूड आहे 'ॲपल' झाडाच. जळू लागल की कस मस्त दिसत!"

आम्ही एकमेकाच्या अगदी जवळजवळ बसलो होतो.

आणि एकदम त्याला, पूर्वी कधी माझ्यापाशी न बोललेल्या गोष्टी बोलण्याची हुक्की आली. मीहि कधी त्याबद्दल आपण होऊन त्याला विचारलेल नव्हत. आता तो आपण होऊन बोलू लागला.

तो म्हणाला, "तुम्ही की नाही, जराशा माझ्या आईसारख्या दिसता. म्हणजे अशा काळोखात, शेकोटीशी जास्त."

"पण जेरी, तू तर इकडे आलास तेव्हा फक्त चारच वर्षाचा होतास. त्यानतर इतकी वर्ष गेली तरी आईची आठवण आहे तुला?"

तो म्हणाला, "माझी आई मॅनव्हिलला रहाते."

क्षणभर त्याची आई आहे या शोधान मी चागलीच चक्रले, कधी नव्हते एवढी गलबलले अस का झाल ते माझ मलाच प्रथम कळल नाही पण मग उमजल. एखाद्या स्त्रीन पोटच पोर अनाथालयात सोडून निघून जाव ही कल्पनाच मला भयकर वाटत होती, त्यात नव्या रागाची भर पडली. पोटचा मुलगा तरी कसला—या जेरीसारखा. ठीक आहे. अनाथालय तस वाईट नव्हत, चालक कनवाळू होते, भले होते, खायलाप्यायला पुरेस मिळत होत, मुल धडधाकट होती, हडसभडस फाटका शर्ट म्हणजे काही तसा जाच नव्हता की कष्ट नव्हते, आणि कष्ट करावे लागत होते तेहि तसे हीन प्रकारचे नव्हते.—हे सर्व खर असेल. या मुलाला कसली उणीव,कमतरता भासत नसेलहि कदाचित् पण हे याचं हडकुळ शरीर,ही आटीव चण, चेहेऱ्यावरच,डोळ्यातल हे अकाली गाभीर्य, याबद्दल काहीच खत न करणारी ही बाई होती तरी कोणत्या प्रकारची? चार वर्षाचा असेल तेव्हाहि हा पोर आज आहे असाच दिसला असेल. या डोळ्यातल हें गहन, अकाली गाभीर्य यानतर कशानेंहि दूर होण्याची, मावळण्याची शक्यता नाही. हें या डोळ्यात कायमच घर करून बसलं आहे. या मुलाचे गुण एखाद्या मूर्खाला, अगदी आंधळ्यालाहि दिसतील. मग याची आई म्हणवणाऱ्या त्या बाईन सुखासुखी याला

अस कस पोरक टाकल? शकाकुशकानी मनात नुसता कल्लोळ उडवला होता. पण ते सार त्याला विचारण्यासारख नव्हत विचारण्यान त्याला त्रास होईल अस वाटत होत.

"तुझ्या आईला अलीकडे कधी भेटलायस का रे तू जेरी?" मी जपूनजपूनच चौकशी चालवली

"हो, दर उन्हाळ्याच्या सुटीत भेटतो की ती मला न्यायला पाठवते कुणाला तरी."

मला ओरडावस वाटल, 'मग ठेवत का नाही ती तुला आपल्या जवळ? का दूर लोटते? कशी?

तो सागत होता, "माझी आई ना, मधूनमधून इथ पण येते तिला सध्या काम नाही"

शेकोटीच्या प्रकाशात त्याची मुद्रा उजळून निघाली होती.

"ती मला कुत्र्याच एक पिल्लू देणार होती, पण आमच्या आश्रमात आम्हाला तसल काही ठेवता येत नाही. गेल्या रविवारी मी घातला होता तो सूट आठवतो का तुम्हाला?" त्याच्या सुरात आता अभिमान ओसडत होता. "माझ्या आईन खिसमससाठी पाठवला मला तो त्याआधीच्या खिसमसला," त्या आठवणीची रुचि मनाच्या जिभेवर घोळवीत तो किंचित् थबकला "त्या आधीच्या खिसमसला बर्फावरून घसरगुडी करायचे स्केट्स् दिले होते बघा तिन मला."

"हो का? चाक असतात ते?"

एकीकडे माझ मन त्याच्या आईची वेगवेगळी चित्र रेखाटण्यात, तिला समजून घेण्यात व्यग्र होत. म्हणजे तस अगदीच काही त्या माउलीन या आपल्या पोराला वाऱ्यावर सोडलेल नव्हत तर! पण मग

मनाला बांध घालीत मी स्वतःला बजावल, पुरेशा माहितीवाचून उगीच तिला दोष लावण बर नव्हे.

" हो, तेच. " जेरी सांगत होता, " चाकाचे स्केटस् . मी दुसऱ्या मुलाना पण ते वापरायला देतो. ती सारखी ते मागून नेत असतात. पण मोडत मात्र नाहीत हो. खूप जपतात उलट. "

दारिद्र्य एवढ एक सभाव्य कारण सोडल तर दुसरं अस कोणत...

जेरी म्हणत होता, " तुम्ही मला मी पॅटची काळजी घेतली म्हणून दिलात ना, त्या डॉलरच मी काय आणणार आहे, ठाऊक आहे का ? आईला हातमोजे आणणार आहे मी त्याचे. "

मी म्हणाले, " वाः ! फार छान ! पण तिच्या हाताच माप आहे का तुझ्याकडे ? "

" हो, " तो म्हणाला, " साडेआठ आहे "

माझ्या हाताकडे त्यान पाहिल.

"तुम्ही साडेआठ मापाचेच मोजे वापरता ना हो बाई ?" त्यान विचारल

" उहू. मला लहान मापाचे लागतात.— सहाचे. "

" मग मला वाटत, आईचे हात तुमच्याहून मोठे आहेत "

मनोमन मला त्या बाईविषयी असूया वाटू लागली होती, तिरस्कार वाटू लागला होता. गरिबी असली म्हणून काय झाल ? माणसाच पोषण काही फक्त भाकरीवर होत नाही. मनाचीहि उपासमार शरीरा-इतकीच होऊ शकते. जवळचा एकुलता एक डॉलर खर्चून तो पोर त्या मूर्ख बाईसाठी हातमोजे घेण्याची स्वप्न पहात होता, आणि ती ? ती लाब मॅनव्हिलमध्ये राहून, त्याला एकटा ठेवून, त्याला फक्त स्केटूस् पाठवून समाधानात जगणार होती. ही आई की कोण ? .

" आमच्या आईला ना, पाढरे हातमोजे आवडतात. " जेरी बडबडतच होता, " एक डॉलरमधें येतील का हो ते ? "

" येतील. " मी म्हणालें.

या बाईला एकदा भेटल्याशिवाय, तिच्या कृत्याचा खुलासा करून घेतल्याशिवाय या ठिकाणाहून परत न जाण्याचा निश्चय मी एव्हाना मनोमन करून टाकला होता.

माणसाच मन जात्याच चंचल, एका वेळी अनेक गोष्टीचा पसारा माडणार, आणि इकडून तिकडे जरा वारा गेला की त्यासरशी चळणार, ढळणार. मी माझं लेखन कसबस पुर केल. जे लिहून झाल होत त्याबद्दल संतोष नव्हता, आणि म्हणून मन दुसऱ्याच गोष्टीत गुतून ठेवीत होते. या नव्या कल्पनेसाठी मेक्सिकोची पार्श्वभूमि आवश्यक होती

फ्लोरिडानला मुक्काम आवरता घेण्याची तयारी मी सुरू केली. आता तडक मेक्सिको, तिथ लेखन—अर्थात् परिस्थिति अनुकूल असल्यास, आणि तिथून आलास्काला माझ्या भावासमवेत. त्यापुढे ? त्यापुढे कोण जाणे, काय, कुठे ते.

जेरीच्या आईला भेटायला मॅनव्हिलला जाण्यासाठी मी सवड काढली नाही अनाथालयाच्या चालकाकडे तिचा विषय काढण्याचं-देखील मला सुचल नाही. कामाच्या आणि बेताच्या गर्दीत जेरी-विषयीचदेखील माझ अगत्य रेसभर कमीच झाल होत त्या पहिल्या बोलण्यातल्या त्या अज्ञात बाईविषयीच्या सतापानतर पुन्हा त्या विषया-वर आम्ही बोललो नाही. जेरीला एक आई असण—कशी का होईना, पण असण,— तीदेखील फार लाब नव्हे, तर मॅनव्हिलमध्येंच असण, या गोष्टीन जेरीविषयीचा माझ्या मनाचा दुखरेपणा नाहीसाच झाला, सल सपला. तो काही तसा अगदीच पोरका आणि एकाकी नव्हता. मग मी त्याचा एवढा विचार तरी कशाला करावा ? त्याच्याहि लक्षात माझ बदललेल वागण तेवढस आल नसाव.

तो रोज येतच होता, लाकडं फोडून देतच होता, छोटीछोटी काम आपखुषीन करीतच होता, बोलायलाहि थाबत होता. आता दिवसा, रात्री थंडी असे. कामात असलें तरी अनेकदा मी त्याला घरात येऊं देई, शेकोटीपुढें भुईवर तो लोळत पडे. एका हातानं कुत्र्याला जवळ लपेटून घेई. दोघेहि पेंगत, मी कामांतून मोकळी

होण्याची निमूट वाट पहात एरवी डोंगराच्या कुशीवरल्या 'लॉरेल'-मध्ये जोडीन हुदडत---बेहोष होऊन. आता ॲस्टर्सचा बहर सपला होता. तेव्हा जेरी मला मेपलची रंगीबेरंगी पान घेऊन येई, चेस्टनटच्या झाडाच्या लोंब्या आणून देई राजस, झगमगत्या पिवळ्या रंगान या लोंब्या नुसत्या थबथबलेल्या असत. माझी जायची तयारी आता अगदी जय्यत झालेली होती.

मी जेरीला म्हणाले, "जेरी, आपली खूप मैत्री जमली होती, नाही इथ? गेले म्हणजे तुझी फार आठवण येईल बघ मला आणि चुकल्याचुकल्यासारख होईल हा पॅट् पण अगदी खुळावून जाईल तू नाहीस अस पाहून. उद्या आम्ही जाणार"

जेरी काहीच बोलला नाही तो निघून गेला तेव्हा, मला अजून आठवत, डोंगरमाथ्यावर प्रतिपदेची चंद्रकोर आलेली होती जेरीला टेकडी चढून जाताना पहात मी निमूट बसून होते. दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे तो येईल, अशी माझी अपेक्षा होती. पण तो फिरकला नाही. मीहि सामानाची बांधाबांध, ते गाडीवर लादण्याचा व्याप, गाडीत कुत्र्यासाठी बिछाना तयार करण्याची यातायात, अशा अनेक कामाच्या चक्रव्यूहात पुरती बुडालेली होते होता होता दुपार उतरली, उन्ह लाबली. मी घराला टाळ लावल गाडी सुरू केली. सूर्य बुडण्याच्या आत डोंगरापार व्हायला हव, हा एकच विचार मनात होता वाटेत अनाथालयाशी थाबले. विजेच बिल आणि घराची चावी मिस् क्लार्कच्या हवाली केली

म्हणाले, "अहो, तुमच्या जेरीला सांगून निघेन म्हणते त्याला बोलावून घेता का जरा?"

त्या बाई म्हणाल्या, "कोण जाणे कुठ आहे तो तें! पण मला वाटत, त्याची तब्येत बरी नसावी. आज दोन प्रहरी अन्नाला हात लावलेला नाही त्यान. एका मुलान त्याला डोंगरावरच्या त्या 'लॉरेल'मधे

जाताना पाहिल. खर म्हणजे आज बॉयलरमधे जळण घालण्याची पाळी त्याची होती. असा चुकारपणा करणाऱ्यातला नव्हे तो. आजच काय झालय्, कोण जाणे!"

मला एकीकडे बरं वाटल, सुटल्यासारख वाटल. त्याला पुन्हा न भेटणच बर हें मला कळत होत, आणि त्याचा निरोप न घेता निघणच तस म्हटल तर माझ्या दृष्टीन सोप होत.—निदान कमी कष्टाच होत

मी म्हणालें, "खर म्हणजे मला तुमच्याशी त्याच्या आईच्या-सबधात काही बोलायच होत. तो इथ का आहे वगैरे. पण मी जरा गडबडीतच आहे. निघेनिघेस्तवर उशीर झाला बघा. त्याच्या आईची गाठ घेण तर आता जमणारच नाही. पण त्याच्या वाढदिवसाला आणि येत्या खिसमसमधें त्याला काहींबाही घेऊन देण्यासाठी तुमच्याकडे हे पैसे देऊन ठेवते. असेन तिथून त्याला वस्तू घेऊन पाठवण जमेल, न जमेल. शिवाय कदाचित् त्याच्याकडे असलेल्याच वस्तू माझ्याकडून दुबार पाठवल्या जाण्याची शक्यताहि भरपूर. उदाहरणार्थ स्केट्स्."

त्या जून, कुंवार बाईनं डोळे फडफडवले. म्हणाली, "स्केट्स्चा त्याला काय उपयोग?"

तिच्या प्रश्नातल्या बुद्दूपणाचा मला जरा रागच आला. मी म्हणाले, "अहो, मला अस म्हणायचय् की, जे त्याची आई त्याला पाठ-वते तेंच पुन्हा पाठवण्याची माझी इच्छा नाही. म्हणजे समजा, त्याच्या आईन त्याला स्केट्स् घेऊन दिलेयृत हें मला माहीत नसत, तर त्याला मी पुन्हा स्केट्स्च पाठवले असते."

ती आपली माझ्याकडे पहातच राहिली. अखेर मूढ सुरात म्हणाली, "मला काही समजतच नाही तुम्ही काय म्हणतां ते? त्याला आई नाही, की त्याच्याकडे स्केट्स्हि नाहीत."

* * *

# जेम्स थर्बर

अमेरिकेंतले एक नाणावलेले विनोदी लेखक आणि चित्र-कार. कोलंबस, ओहियो इथें १८९४ साली जन्म झाला. १९१९ मध्यें ओहिओ विश्वविद्यालयाची पदवी घेतली लहान वयात झालेल्या एका अपघातात एक डोळा निकामी झाला असल्याने पहिल्या महायुद्धाच्या काळात लष्करभरतीतून याना वगळण्यात आले. १९१७–१८ हे साल त्यानी वॉशिंग्टन-मधल्या सरकारी गृहखात्यात्त आणि पॅरिसमधल्या अमेरिकन वकिलातीत 'कोड–क्लार्क' म्हणून काम करण्यात घालविले त्यानतर वृत्तपत्र–प्रतिनिधि म्हणून 'कोलबस डिस्पॅच', 'शिकागो ट्रिब्यून'ची पॅरिस इथे निघणारी आवृत्ति, इत्यादि वृत्तपत्रासाठी त्यानी काम केलें काही काळ ते 'दि न्यूयॉर्कर' या मासिकाचे व्यवस्थापक–सपादक म्हणूनहि होते पुढे त्याच मासिकाच्या 'टॉक ऑफ द टाउन' या सदराच्या खात्यात त्याना स्तंभलेखक म्हणून नेमण्यात आले. १९३३ मध्यें त्या जागेचा त्यानी राजीनामा दिला, तथापि त्या मासिकासाठी ते अखेरपर्यंत अधूनमधून लेखन मात्र करीत राहिले. बर्म्युडा,इग्लड, हॉलिवुड इत्यादि ठिकाणी त्याचें वास्तव्य होते. लेखक म्हणून नावारूपाला येण्याआधीपासूनच ते चित्रे काढीत असत. त्याची ढोबळ, गोबरी गोबरी आणि उत्स्फूर्त चित्रें त्याच्या लेखनाइतकीच लोकप्रिय होती. १९६१ मध्ये ते निवर्तले. इथे अनुवादित केलेली त्याची 'दि कॅटबर्ड सीट' ही कथा एका 'डिपार्टमेंट स्टोअर'च्या फायलिग सेक्श-नच्या प्रमुखानें एका 'एफीशिअन्सी एक्स्पर्ट' बाईचा कसा बदोबस्त केला त्याची मजेशीर कहाणी आहे.



# साहेबाच्या बाईचा बंदोबस्त



सोमवारी रात्रीं, —हो, सोमवारीच रात्री— ब्रॉडवेवरच्या एका चिकार गर्दीच्या चिरूटाच्या दुकानी मि. मार्टिनन 'कॅमल्स' चिरूटाच बडल खरेदी केल. आसपासच्या थिएटरातून नाटक सुरू होण्याची वेळ होत आली होती आणि त्या विशिष्ट दुकानी एका वेळी सातआठजण एकदम चिरूट खरेदी करीत होते. गल्ल्यावरच्या माणसान मि. मार्टिनकडे पाहिलंसुद्धा नाही. मि. मार्टिनन तें चिरूटाचं बडल ओव्हरकोटाच्या खिशात कोंबल आणि तो तडक दुकानाबाहेर पडला. 'एफ. ॲड एस्.' कपनीपैकी कुणी त्याला तस चिरूट विकत घेताना पहाता तर आश्चर्यान बिचाऱ्याचा प्राणच गेला असता. कारण मि. मार्टिन धूम्रपान करीत नाही, आणि त्यानं जन्मात कधींच ते केलेल नाही, हे कपनींत जवळ जवळ सगळ्याना ठाऊक होत. पण कुणी पाहिल नाही.

मिसेस् उल्गाइन बॅरोज हिची वाट वाट लावून टाकण्याची भीष्मप्रतिज्ञा मि. मार्टिननं केली त्याला नुक्ता कुठें आठवडा होत होता. 'वाट

वाट लावून टाकणं,' ( सिंगल वाट नव्हे, डबल वाट, ) हा शब्दप्रयोग मि. मार्टिनला विशेष आवडलेला होता. तसा दिसायला तो उगीच जरासा उग्र होता, पण अर्थ पाहिला तर, एका चुकीची दुरुस्ती करण एवढाच त्याचा अर्थ होता चूक अर्थात् मि. फिटवेलर साहेबाची. गेल्या आटवड्यातली प्रत्येक रात्र मि. मार्टिनन आपली 'योजना' तयार करण्यात आणि तयार झालेली योजना काळजीपूर्वक तपासण्यात जागवलेली होती. आता बिऱ्हाडीं परतताना, पुन्हा एकवार मि. मार्टिनन तिची उजळणी केली. शभरञ्च्या खेपेला या साऱ्या प्रकरणातल्या अनिश्चितीच्या भागाबद्दल त्यानं स्वतःकडे उद्वेग प्रकट केला. अंदाजपचे काम करण्याची मि. मार्टिनला जात्याच नावड होती, आणि इथे अदाजाचाच भाग सपाढून सभवत होता. तशी त्यान शिजवलेली 'योजना' अगदी नैमित्तिक स्वरूपाची, पण बरीच धाडसी होती. तिच्यात धोके फार होते, वाधे होते. कुठेंदेखील एखादी गल्लत, गफलत होण्याचा सभव दाट होता. आणि नेमकी यातच त्या योजनेच्या निर्मात्याची म्हणजे मि. मार्टिनची सारी अक्कलहुशारी साठली होती. म्हणजे कुणालाहि तिच्यात आपल्या या अतिसावध, अग मोडून आणि शिस्तीने सर्व काहीं करणाऱ्या मि. एरविन मार्टिनचा हात असेल असं वाटण बापजन्मी शक्य नव्हत. मि. एरविन मार्टिन म्हणजे तो 'एफ. ॲड एस्.'च्या फायलिंग खात्यात 'हेड' असलेला— 'माणूस हा स्खलनशील आहे पण मार्टिन नाहीं' अस ज्याच्याविषयीं मि. फिटवेलरसाहेब एकदा म्हणाले होते तो—त्याचा या योजनेशीं कोणीदेखील सबंध जोडण शक्य नव्हत. कसा जोडणार? म्हणजे अगदीच मुद्देमालानिशी तो सापडता तर गोष्ट वेगळी होती.

आपल्या बिऱ्हाडी बसून, ग्लासातलं दूध पीत पीत, मि. मार्टिननं मिसेस् उल्गाइन बॅरोजविरुद्धची आपली बाजू आणखी एकदा नीट तपासून बघितली. गेल्या सात रात्री बघत आला होता, तशीच. अगदी आरंभापासून त्यानं आरंभ केला. त्या बयेचा तो बदकासारखा कलकलता

आवाज आणि घोडीसारख खिदळण 'एफ. ॲंड एस्.'च्या 'दफ्तरा'त पहिल्यादा उमटल होत ७ मार्च १९४१ ला. (तारखाच्या बाबतींत मि. मार्टिनची स्मरणशक्ति तशी जबरदस्त होती.) स्वतःला 'पर्सनल चीफ' म्हणवणाऱ्या बुढ्ढया रॉबर्टन 'फर्मचे प्रेसिडेंट फिटवेलरसाहेब याच्या या नव्यानं नियुक्त झालेल्या खास सल्लागार' अशा शब्दात तिची ओळख सर्वांना करून दिली होती. त्या बाईला नुसत एकदा पाहूनच मि. मार्टिनचा तिच्याविषयी कमालीचा प्रतिकूल ग्रह बनला होता. इतकच की, त्यानं त्या वेळी तसं दाखवल नाही. द्यायचा म्हणून तिच्या हाती त्यान आपला हात दिला होता, बारीक नजरेनं तिला एकदा न्यहाळल होत आणि उगीच औषधापुरत स्मित केलं होत. त्याच्या टेबलावरच्या कागदपत्रांच्या चळती पहात तिन विचारलं होत, "वेल, आर यू लिफ्टिंग द ऑक्सकार्ट आउट ऑफ द डिच ?" प्राकृतात याचा अर्थ 'खड्ड्यातून बैलगाडी बाहेर काढता आहात काय ?' असा होता. दुधाचा एक भुरका मारता मारता आता मि. मार्टिनला स्मरल कीं आपण तेव्हा किंचित् चक्करलोच होतो. आपली दाडी गेली होती. आता त्यान स्वतःला बजावलं की, तिच्या वैयक्तिक खोडीबद्दल आपल्याला बोलण्याचं कारण नाही. आपला प्रश्न आहे तो साहेबाची विशेष सल्लागार म्हणून तिन केलेल्या गुन्ह्यांचा. विचाराच्या ओघात हें अमलांत आणण मात्र त्याला कठीण जाऊं लागल. म्हणजे असं होण वास्तविक अयोग्य आहे असा आक्षेप त्यान उपस्थित करून आणि तो मान्य करूनही त्याला हे कठीण जाऊं लागल. एखाद्या बेशिस्त साक्षीदारासारखा, एक बाई म्हणूनच तिचा विचार त्याच्या मनात घोळघोळून अडमडत राहिला. गेली जवळ जवळ दोन वर्ष तरी ही अफलातून बाई त्याला पिडत राहिलेली होती. कार्यालयात, लिफ्टमध्ये, खुद्द मि. मार्टिनच्या टेबलाशी-देखील एकसारखी ती सर्कशीतल्या अबलख घोड्यासारखी ठुमकत घुसून ते तिचे खुळचट प्रश्न न विसरता भसाड्या आवाजांत विचारीत

आली होती " खड्डयातून बैलगाडी बाहेर काढता आहांत वाटत ? " " मटाराचा वाफा उखडण्याचा विचार आहे की काय तुमचा ? " " पावसाळी पिंपात बोबलताय् झालं तुम्ही ! " " लोणच्याची बरणी खरवडण्यासारख होतय् हें ! " वगैरे वगैरे. अरे ! काय आहे काय ! या आचरटपणाचा अर्थ मि. मार्टिनचा असिस्टट म्हणून काम करणाऱ्या जोए हार्टन त्याला नतर समजावून दिला होता. तो म्हणाला होता, " बाई ' डॉज बॉल 'ची 'फॅन' दिसते रेडियोवरून डॉज बॉलच्या सामन्याच वर्णन तो रेड बॉर्बर करतो ना, तेव्हा तो हे असले शब्दप्रयोग वापरतो. मुळांत दक्षिण—अमेरिकेंत ऐकले असावेत ते त्यान. " त्यातल्या एकदोन शब्दप्रयोगाच स्पष्टीकरणहि जोएन दिल होत उदाहरणार्थ, ' मटाराचा वाफा उखडण ' म्हणजे धुमाकूळ घालण. 'कॅटबर्ड का कसल्या सीटमध्यें बसण ' म्हणजे मख्ख बसण, उदाहरणार्थ तीनदा चेंडू आला तरी काहीच हालचाल न करण. मि. मार्टिनन आता प्रयत्नपूर्वक हें सर्व मनातून काढून टाकल. हें त्याला फार त्रासदायक ठरल होत, त्याला अक्षरशः वेड लागण्याची पाळी आली होती. पण असल्या पोरकट गोष्टींनी कुणाच्या खुनाला प्रवृत्त होण्याइतका मि मार्टिन लेचापेचा माणूस नक्कीच नव्हता. मिसेस बॅरोजविरुद्धच्या महत्त्वाच्या आरोपाकडे वळता वळता आता त्याला सहजी वाटल की आपल दैव बलवत्तर म्हणूनच या प्रकाराना आपण बधलो नाही. बाह्यतः तरी नेहमीच त्यान त्या बाबतीत सभ्य सहनशीलतेची भूमिका ठेवली होती. त्याची दुसरी असिस्टट मिस पेअर्ड एकदा त्याला म्हणालीदेखील होती की, " मला तर बाई वाटत, कीं ती बया तुम्हाला आवडतदेखील असावी, मि. मार्टिन. " यावर मार्टिन उगीच किंचित् हंसला होता.

मि. मार्टिनच्या मनात इथ न्यायाधीशाचा हातोडा वाजला आणि मुद्द्याला धरून पुनश्च सुनावणी पुढें सुरू झाली. मिसेस उल्गाइन बॅरोज या बाईवर हेतुपूर्वक, प्रच्छन्नपणें आणि अव्याहतपणें

'एफ. ॲंड एस्.' कपनीतली कार्यकुशलता आणि घडी बिघडविण्याचा गभीर आरोप ठेवण्यात आलेला होता. या बाईचा कपनीतला उदय आणि तिच सत्तासपादन या गोष्टीचा थोडा आढावा इथ घेण पूर्णपणें वाजवी, फायदेशीर आणि सयुक्तिकदेखील ठरल असत. ही सारी हकीकत मि. मार्टिनला कळली होती मिस् पेअर्डकडून. या मिस् पेअर्डला कोणत्याहि गोष्टीचा सुगावा अचूक लागे. तिच्या म्हणण्यानुसार, एका मेजवानीच्या प्रसगी ही मिसेस् बॅरोज आणि फिटवेलरसाहेब याची गाठ पडली होती. या मेजवानीत, पिऊन तर्र झालेल्या एका घटिंगणाच्या मगरमिठीतून या बाईन फिटवेलरसाहेबाचा गजेंद्रमोक्ष केला होता. फिटवेलरसाहेब— मि. फिटवेलर— हे कुणी एक सुप्रसिद्ध फुटबॉल–शिक्षक असल्याच्या तद्दन गैरसमजानच त्या घटिंगणान त्याना जाऊन तस धरल होत. त्याची मुक्तता केल्यानतर मिसेस् बॅरोजन त्याना एका सोफावर नेऊन अलद ठेवल आणि त्याच्यावर तिन कसली तरी मायावी मोहिनी घातली होती. म्हाताऱ्याची तिथल्या तिथेच खात्री पटली की, ही बया कुणी महान् कर्तृत्वशालिनी स्त्री असून आपल आणि आपल्या फर्मच कल्याण करील तर ते हीच करील! आठवड्याभरातच साहेबान आपली विशेष सल्लागार म्हणून कार्यालयात बाईची नेमणूक-देखील करून टाकली होती. बाईन पाऊल ठेवल आणि कपनीत सावळा-गोंधळ सुरू झाला होता. मिस् टायसन, मि. ब्रॅण्डेज, आणि मि. बार्टलेट याना 'नारळ' मिळाला होता. मि. मन्सन हॅट उचलून चालता झाला होता, त्यान राजीनामा नंतर टपालान पाठवला. या प्रकरणात फिटवेलर साहेबाशी बोलण्याचा प्रयत्न बुड्ढ्या रॉबर्टसून केला, मि. मन्सन याच्या खात्यात 'अलीकडे' 'जरासा' विस्कळितपणा आल्याच तो पुटपुटला. जुनीच पद्धत बरी होती असं त्यान नुसत उच्चारताच फिटवेलर साहेबांनी ठण-ठणीत नकार भरला. त्याचा मिसेस् बॅरोजच्या कल्पनावर नितात भरोसा होता. ते म्हणाले, "तिच्या कल्पना चूक नाहींत. जरा रुळल्या पाहिजेत, जराशा मुरल्या पाहिजेत, एवढंच." मग मि. रॉबर्टसूनं नाद सोडला होता.

आता, मि. मार्टिननं, या बॅरोजबाईनं कंपनीत घातलेल्या गोंधळाचा मनाशी तपशीलवार आढावा घेतला. प्रारंभी कंपनीच्या डोलाऱ्याच्या केवळ शेंड्याशीच खटपट करणारी ही बाई आता त्याच्या ऐन पायावरच कुऱ्हाड चालवायला निघाली होती.

आपल्या आढाव्यामध्यें मि. मार्टिन, १९४२ च्या नोव्हेंबरातल्या दोन तारखेशीं आला. वार सोमवार. वेळ दुपार. एक आठवडाच त्या घटनेनंतर उलटलेला होता. त्या दिवशी, दोनप्रहरी ठीक ३ वाजता, मिसेस् बॅरोज त्याच्या केबिनमध्ये दौडत आली. "बू ऽ!" ती खिंकाळली. "बू ऽ! लोणच्याच्या पिपाच बूड खरवडताय् वाटत?" कपाळावर बांधलेल्या, हिरव्या रंगाच्या 'आय-शेड' खालून मि. मार्टिननं तिच्याकडे एकवार दृष्टीक्षेप केला, पण उत्तर केल नाही. मग ती त्याच्या केबिनभर भरकटू लागली, तिथल सारं कांहीं आपल्या मोठाल्या, बटबटीत डोळ्यात भरून घेऊ लागली. मध्येंच ताड्दिशी तिनं विचारल, "ही इतकी सगळीं फायलिंग कॅबिनेट्स् खरोखरी लागतात का तुम्हाला?" मि. मार्टिनच्या काळजान यासरशी मोठी उशी खाल्ली. आवाज मोठ्या शर्थीनं चढू न देता नेहमीच्या सुरात तो यावर म्हणाला होता, "यातली प्रत्येक फाइल कंपनीच्या सध्याच्या एकदर सिस्टिममध्यें फार महत्त्वाचीच आहे." यावर ती त्याच्या अंगावर खिंकाळली होती, "उगीच मटाराचा वाफा उखडू नका!" आणि दरवाजाकडे गेली होती. तिथून गडगडली होती, "पण इथं बरीच रद्दी जमवून ठेवताय् तुम्ही, एवढं नक्की." यावरून मि. मार्टिनच्या मनात संशयाला जागाच उरली नव्हती. त्याच्या आवडत्या खात्यावर तिचा फेरा सध्या आलेला होता. कुऱ्हाड उगारलेली होती, पहिला घाव काय तो पडायचा होता. तो अजून पडला नव्हता, अजून फिटवेलर साहेबाकडनं निळा मेमो, त्या भयकर बाईच्या आचरट सूचनासहित, आला नव्हता. पण तो आता नाही मग येणार याबद्दल मि. मार्टिनच्या मनात तिळमात्र सशय राहिला नव्हता. तडकाफडकीं

काहीतरी करण अवश्य होत. एव्हानाच एक सबध आठवडा काही न करता निघून गेला होता. हातात दुधाचा ग्लास धरूनच, आपल्या बिऱ्हाडी, मि. मार्टिन जागचा उठून उभा राहिला. स्वतःशी म्हणाला, " ज्यूरीतील सभ्य गृहस्थहो, या महाभयकर गुन्ह्याबद्दल आरोपीला फाशीची सजाच दिली जावी अशी आमची जोरदार मागणी आहे "

दुसऱ्या दिवशी मि. मार्टिन ऑफिसात आला तो नित्यासारखा. नेहमीप्रमाण आपली सारी काम त्यान उरकलीं. मात्र बारकाईन पहाणाऱ्याच्या लक्षात आल असतं तें अस की,आज तो अधिक वेळा चष्म्याची भिग पुसून स्वच्छ करीत होता आणि एकदा आधीच्याच टोकदार पेन्सिलीला त्यान जोरजोरानं पुन्हा टोक केली. पण मिस् पेअर्डसारख्या जात्या बारीक नजरेच्या बाईच्या ध्यानींदेखील हे येऊ शकल नाही. त्या दिवशीं फक्त एकदाच त्याची 'शिकार' त्याच्या नजरेला पडली. हॉलमध्यें त्याच्या अंगावरून ती 'कसं काय ?' किंचाळून पुढें निघून गेली. सध्याकाळचे साडेपाच वाजले तशी मि. मार्टिन नेहमींसारखा घराकडे निघाला. घरी येऊन नेहमींसारखाच ग्लासभर दूध प्यायला. अख्ख्या हयातींत याहून 'स्ट्रॉंग' अस काहीं त्यानं कधीं घेतलेल नव्हत—म्हणजे नाही म्हणायला 'जिंजर एल' सोडली तर. पण ती काही स्ट्रॉंग नव्हती. काही वर्षांपूर्वी एफ. अँड एस. कपनीच्या 'एस्.' म्हणजे सॅम श्लॉसरसाहेबान स्टाफच्या मीटिंगमध्यें मि मार्टिनच्या निर्व्यसनी स्वभावाबद्दल चांगले उद्‌गार काढले होते. तो म्हणाला होता, "आपल्यापैकी सर्वात कार्यकुशल असा मि. मार्टिन मद्याला स्पर्श करीत नाही. इतकच नव्हे, तर धूम्रपानदेखील करीत नाही. परिणामीं त्याची कार्यकुशलता चागली राहिली आहे हें आपण पहातोंच." पलीकडेच बसलेल्या फिटवेलरसाहेबानी यावर सतोषपूर्वक मान डोलवून आपल मतैक्य प्रकट केलं होत.

फॉर्टि सिक्स्थ स्ट्रीटवरल्या फिफ्थ ॲव्हन्यूजवळच्या श्रॅफ्टच्या हॉटेलकडे आता मि. मार्टिन निघाला तेव्हा तो महत्त्वपूर्ण दिवस त्याला आठवला. रिवाजाप्रमाणे न चुकता ठीक आठ वाजता तो हॉटेलात पोचला, पावणेनऊपर्यंत त्याच जेवून आणि ' सन 'च अर्थव्यवहाराच पान संपूर्ण वाचून सपल. हाहि त्याचा रिवाजच होता. जेवल्यावर जरा चालण्याचा व्यायाम घ्यावा असा त्याचा आणखी एक रिवाज. त्याप्रमाणें जरा रमतगमतच तो फिफ्थ ॲव्हन्यूवरन निघाला. हात-मोज्याआत उकडून घाम आला आहे आणि मस्तक थडगार झाल आहे अस त्याला वाटल. ओव्हरकोटाच्या खिशातले ' कॅमल ' छाप चिरूट काढून ते त्यान जाकिटाच्या खिशात ठेवले. तसे ठेवताना, आपल्या मनावर उगीच जादा ताण तर पडलेला नाही ना, अस त्याला वाटल. मिसेस् बॅरोज फक्त ' लकीज ' ओढत असे. लिपस्टिकचे डाग पडलेल्या ' लकीज 'च्या थोटकानी भरलेल्या तिच्या घरच्या ॲश-ट्रेमध्यें आपला एक ' कॅमल ' ओढून टाकावा असा मि. मार्टिनच्या मनचा डाव होता. या डावान मिसेस् बॅरोजची दाडी गुल करण्याची त्याची महत्त्वाकाक्षा होती. ही जमण आताच सागवत नव्हत. डाव फसणहि शक्य होत. एक तर जवळ जवळ पुरा चिरूट ओढण्याचा सवाल होता. घुसमटून मोठा ठसका लागला तरी सगळ मुसळ केरात जाण्याची शक्यता होती.

तस वेस्ट ट्वेल्थ स्ट्रीटवरच या बाईच निवासस्थान मि. मार्टिनन याआधी कधीं बघितलेल नव्हत. पण तें कुठ आणि कस असेल याच पुरेस स्वच्छ चित्र त्याच्या नजरेपुढें होत. सुदैवान बाईन स्वतःच अनेकदा त्याबद्दल बडबडून टाकल होत. या ट्वेल्थ स्ट्रीटवरच्या लाल विटाच्या टुमदार अशा तीनमजली घरात पहिल्या मजल्यावर ती रहात होती. दरवाज्यावर रखवालदार नव्हता, कुणी नव्हत. होते काय ते दुसऱ्या नि तिसऱ्या मजल्यावर रहाणारे बिऱ्हाडकरू. आता चालतां चालतां मि.

मार्टिनच्या लक्षांत आलं कीं, आपण तिथं साडेनऊपूर्वी पोंचूं. आफ्टच्या हॉटेलपासून फिफ्थ ॲव्हेन्यूवरून उत्तरेकडे अशा एका ठिकाणीं यायच की जिथून मिसेस् बॅरोजच्च बिऱ्हाड यायला निदान दहा तरी वाजतील–हा त्याचा मूळ बेत. या विशिष्ट वेळेला त्या इमारतींत तशी विशेष वर्दळ असण्याची शक्यता नव्हती. पण त्याच्या अगदीं सहज-पणाच्या सरळसोट अविर्भावात या वाकड्या वाटेन उगीच एक संकोच मात्र निर्माण केला असता. म्हणून आयत्या वेळी त्यान हा बेत बदलला होता. नाहीतरी एवढ्या मोठ्या इमारतीत कोण केव्हा शिरेल आणि बाहेर पडेल त्याचा नक्की नेम तरी काय सांगता येणार होता ? कोण-तीहि वेळ निवडली तरी धोका हा होताच. फार मोठा धोका होता. कुणी समोर अडमडलच तर उल्गाइन बॅरोज बाईच्या बदोबस्ताचा बेत कायमचा 'फाइल' करावा लागणार होता! तिच्या बिऱ्हाडी कुणी असत तरी हेंच घडणार होत. या परिस्थितीत 'सहज जात होतो, घर लक्षात आल म्हणून म्हटल भेटून चलाव' इतकच तो तिला म्हणणार होता.

मि. मार्टिन ट्वेल्थ स्ट्रीटवर वळला तेव्हा नऊ वाजून ठीक अटरा मिनिट होत होती. एकजण त्याच्या बाजूने निघून गेला आणखी दोघजण बोलत बोलत गेली. यातला एक पुरुष आणि दुसरी बाई होती. चौक मागें टाकून त्या घरापाशी मि. मार्टिन आला तेव्हा अलीकडे पलीकडे पन्नास कदमाच्या परिसरात चिटपाखरूसुद्धा नव्हत. मि. मार्टिन भराभरा पायऱ्या चढला. झट्दिशी छोट्या 'व्हेस्टिब्यूल'-मध्यें शिरला. "मिसेस् उल्गाईन बॅरोज" अशा कार्डाशेजारची घंटी दाबण्याला तो विसरला नाही. कुलूप आपोआप उघडू लागताच त्यानें त्वरा करून एका उडीत दरवाजा पार केला, वेगानें तो आत घुसला. आपल्यामागें त्यानें दरवाजा पुन्हा बंद केला.

हॉलच्या छतापासून एका साखळीला टांगलेल्या झुंबरातला दिवा भगभगीत पेटला होता. त्याचा उजेड उगाच केवढा तरी पडला होता. त्या उजेडात डावीकडे जिना वर गेलेला त्याला दिसला. त्यावरसुद्धां कोणी नव्हत. उजवीकडे एका खोलीचं दार उघडलं. मि. मार्टिन चवड्यावर चालत तुरुतुरु तिकडे गेला.

"आयला ! मि. मार्टिन !" मिसेस् बॅरोज त्याला पहाताच भल्या मोठ्यादां गडगडली आणि तिच्या खिंकाळल्यागत हंसण्यान बंदुकीच्या बाराचे उठतात तसे प्रतिध्वनि त्या रिकाम्या हॉलमध्यें उठले. फुटबॉलच्या खेळात गडी चेंडू पळवतात तसा मि. मार्टिन तिच्या बाजूनें आत घुसण्याच्या प्रयत्नात तिच्या अंगावरच धडकला. दार धाड्दिशी लावून घेत ती ओरडली, "ए मुला, धक्का काय मारतो !" आणि पुन्हा तें खिंकाळण. दोघहि आता मिसेस् बॅरोजच्या दिवाणखान्यात होतीं. निदान शभर दिवे एकदम पेटावेत तेवढा प्रकाश त्या ठिकाणी मि. मार्टिनला भासला. "काय झाल तरी काय एवढ ? वाघबीघ माग लागला की काय ?" त्या महामायेन गर्जून विचारल, "बोकडासारखे उडारत आलात ते !" प्रथम मि. मार्टिनच्या तोंडून शब्दच उमटेना. त्याची वाचा बसली. प्राण घशात गोळा झाला शेवटीं कसाबसा तो बोलला, "म–मी–हो." त्याचा कोट त्याच्या अंगातून काढून खुटीला लावताना ती एकसारखी बडबडत होती आणि गडगडून हंसत होती. मि. मार्टिन कसाबसा म्हणाला, "नको नको. कशाला ? इथंच लावतो की." मुष्किलीने त्यानें कोट धरून ठेवला आणि तो दरवाजालगतच्या खुर्चीच्या पाठीला अडकवला. "आता हॅट आणि हातमोजे पण काढा." ती म्हणाली, "एका स्त्रीच्या बिऱ्हाडी आला आहात तुम्ही !" मि. मार्टिननं हॅट काढून अलगद कोटावरच लावली. त्याच्या हिशेबापेक्षा मिसेस् बॅरोज आतां त्याला जास्तच धिप्पाड वाटत होती. त्यान हातमोजे हातात तसेच ठेवले. तो म्हणाला, "सहज जात होतों. घर लक्षांत आलं म्हणून... कुणी आहे वाटतं घरांत ?" कधीं नव्हे एवढ्या जोरानं यावर मिसेस् बॅरोज हसली.

" छया ! " ती म्हणाली, " कुणीसुद्धा नाही. फक्त आपण दोघ. आणि काय हो विनोदमूर्ति, असे पाढरेफटक का दिसताहात तुम्ही ? काय झालंय् काय तुम्हाला ? थाबा. तुम्हाला डोस देतें डोस." दिवाणखान्याच्या पलीकडल्या टोकाच्या दाराकडे ती जाऊ लागली. " स्कॉच ॲंड सोडा चालेल ना ? पण आधीं हें सांगा, असल कांही घेतल नसेल कधीं तुम्ही, खर की नाही ? अं ? " वळून तिन मि. मार्टिनकडे मिस्किल दृष्टीक्षेप फेंकला. मि. मार्टिनन आता मात्र स्वतःला शिकस्तीन सावरल. " स्कॉच ॲंड सोडा चालेला मला." त्याच्या तोंडून शब्द गेलेले त्यान ऐकले. आंत, स्वयंपाकघरात गमतींचे हास्यध्वनि उठले ते त्याला ऐकू येत होते.

' हत्यारा ' साठी भर्रदिशी मि. मार्टिनन आता दिवाणखानाभर आपली बारीक नजर भिरीभिरी फिरविली. तिथ ते सापडेल असा त्याचा अदाज होता, त्यावर तो अवलबून होता. शेकोटी ढोसण्याची एक लोखडी सळई त्याला दिसली, एक काठी दिसली. या प्रकारच आणखीहि काही होत. पण हे उपयोगी नव्हत. त्याच्या बेतात हें बसत नव्हत. तो दिवाणखान्यात फिरू लागला. एका टेबलाशी आला. नक्षीदार मुठीचा, कागद कापण्याच्या धातूचा चाकू त्यावर पडलेला होता. त्यान तो उचलण्यासाठी हात लाबवला आणि पितळेच छोट भाड उलथल. त्याच्यातून पोस्टाची तिकिट उधळली आणि ठण्ठण् करीत तें भाड जमिनीवरून आपटत घरंगळत गेलं. स्वयंपाकघरांतून मिसेस् बॅरोज ओरडली, " अरे ए मुला, मटाराचा वाफा उखडतोस की काय तू ? " मि. मार्टिन यावर बिकटपणें हंसला. चाकू उचलून त्याचं टोंक तो डाव्या मनगटावर चालवून पाहूं लागला. छे ! बोथट होतं. उपयोगाच नव्हत हें हत्यार.

दोन उंच ग्लास घेऊन मिसेस् बॅरोज स्वयंपाकघरांतून बाहेर आली तेव्हां मि. मार्टिन हातांत हातमोजे तसेच ठेवून आपल्या येथवरच्या कर्तुकीनं आपणच थक होऊन उभा होता. खिशांत

चिरूट होते. या बाईन मद्य तयार करून आणल होत— छे! सार अशक्य कोटींतलं! पण तरीहि खरं! त्याच्या मनाच्या एका कोपऱ्यात आता अस्पष्टपणे एक कल्पना तरळली, स्पष्ट झाली. मिसेस् बॅरोज म्हणत होती, "कृपा करा आणि आता ते हातमोजे ठेवा की काढून" मि. मार्टिन म्हणाला, "घरीं नेहमी हातातच असतात हे माझ्या" मनातली कल्पना पहाता पहाता तरारली होती, फुलली होती, तिला चौफेर धुमारे फुटले होते. विलक्षण कल्पना! नामी कल्पना! एका सोफ्यापुढच्या कॉफी–टेबलावर तिन हातातली ग्लास ठेवली आणि ती सोफ्यात बसली. म्हणाली, "ह, या आता असे इकडे आणि बसा इथ." मि मार्टिन तिथ गेला आणि तिच्या शेजा गीच बसला. खिशातल्या 'कॅमल्स'च्या बडलातून एकच चिरूट बाहेर काढण त्याला कठीण गेल. पण शेवटी त्याला ते जमल हसत हसतच तिन काडी पेटवून पुढे धरली. मि. मार्टिनन चिरूट शिलगावला. मग तिन त्याला त्याचा ग्लास दिला. "मजाच आहे." ती म्हणत होती. "भारीच मजा. तुमच्या तोंडात चिरूट आणि हातात दारूचा ग्लास!"

मि. मार्टिनन, न घुसमटता, चिरूटाचा एक माफक दम मारला आणि मद्याचा घुटका घेतला. तो म्हणाला, "त्यात काही नाही. मी नेहमी घेतो." तिच्या ग्लासावर त्यान आपल ग्लास टेकवल. किणकिणता आवाज झाला. मि. मार्टिन म्हणाला, "वृद्ध कपि फिटवेलर साहेबाच आपण भल चिंतू या" आणि पुन्हा एक घुटका त्यान घेतला. मागच्याहून मोठा. घसा जळजळला. पण मि. मार्टिनन तोंड मुळीच वाकड न करता तो घोट घुट्टदिशी गिळून टाकला. आता बॅरोजबाईची बैठक बदलली, सूर बदलला "मि. मार्टिन," ती कडक शब्दात म्हणाली, "आपल्या साहेबाचा तुम्ही धडधडीत अपमान करता आहा." आता ती फिटवेलर साहेबाची खास सल्लागार म्हणून बोलत होती. मि. मार्टिन म्हणाला, "एक बॉब तयार करतो आहें मी. तो उडाला की 'फिट्टू' पार नरकापर्यंत उडत जाणार आहे!" तसे आता कुठ

दोनच घोट त्याच्या पोटांत गेले होते; तेदेखील 'स्ट्रॉंग' नव्हते. छेः! त्यांचा कांहीं हा परिणाम म्हणतां आला नसता. मिसेस् बॅरोजनं थंडपणें पृच्छा केली, "अफू, गांजा, भांग वगैरे कांहीं घेतां वाटतं तुम्ही अधून-मधून?" मि. मार्टिन म्हणाला, "नोप. हेरॉइन घेतों. हेरॉइन फारच स्ट्रॉंग. त्या थेरड्याची वाट लागेल तेव्हां घशापर्यंत हेरॉइन रिचवून पडणार आपण! उत्सव करणार!" बॅरोज ताड्दिशीं उठत ओरडली, "का—य? मिस्टर मार्टिन! बस्स! पुष्कळ झालं! इथून चालते व्हा आधीं तुम्ही! आत्तांच्या आत्तां!" मि. मार्टिननं आणखी एक मोठा घुटका घेतला. ॲश—ट्रेमध्यें चिरूटाची राख झाडली, कॉफी—टेबलावर चिरूटांचं बंडल ठेवलं आणि तो उठला. ती बटाट्याएवढे डोळे वटारून त्याच्याकडे खाऊं का गिळूं करून पहात होती. तो खुर्चीकडे गेला. त्यानं हॅट डोक्यावर ठेवली, कोट चढवला. तर्जनी नाकावर ठेवून तो म्हणाला, "कुठें बोलूं नका." मिसेस् बॅरोजच्या तोंडून 'अस्सं' एवढा एकच उद्गार कसाबसा निघूं शकला. मि. मार्टिननं दाराच्या कडीला हात घातला. "मी कॅटबर्ड सीटमध्यें सध्यां बसलोंय्, बॅरोजबाई." तो म्हणाला. बाईला त्यानं जीभ बाहेर काढून दाखवली आणि तो बाहेर पडला. कुणीच त्याला बाहेर पडतांना पाहिलं नाहीं.

मि. मार्टिन आपल्या बिऱ्हाडीं आला तो पायींच. अकरा वाजायला अजून बराच वेळ होता. कुणीहि त्याला बिऱ्हाडांत शिरतांना पाहिलं नाहीं. दांत घांसून त्यानें दोन ग्लास दूध रिचवलं आणि त्याला एकदम झक्क वाटलं. म्हणजे त्याला चढली वगैरे नव्हती, कारण त्याला चढलेली नव्हतीच. चालण्याच्या व्यायामानं व्हिस्कीची होती नव्हती तार निघून गेली होती. मि. मार्टिन बिछान्यांत आडवा झाला आणि एक मासिक कांहीं वेळ त्यानं वाचलं. मध्यरात्रीआंत त्याला सुंदर झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ठीक आठ वाजून तीस मिनिटांनीं मि. मार्टिन नेहमींसारखा कार्यालयांत पोंचला. पावणेनऊला बॅरोजबाई त्याच्या केबिनमध्यें घडकली. तत्पूर्वी कधींहि ती दहाआधीं कामावर आलेली

नव्हती. बाई फणफणत ओरडली, “थांबा, फिटवेलरसाहेबांना सार काही सांगतें मी! त्यानी पोलिसमध्यें दिलं तरच बेश होईल! तीच लायकी आहे तुमची! तीच!” थक्क मुद्रेन आणि धक्का बसल्याच्या आविर्भावानं मि. मार्टिन तिच्याकडे पहात राहिला. “काय म्हणता तुम्ही?” त्यान विचारल. बॅरोजबाई फुस्स् फुस्स् करीत तरातरा त्याच्या केबिनमधून चालती झाली. मिस् पेअर्ड आणि जोए हार्ट तिच्याकडे आ वासून पहात मागें उरले. मिस् पेअर्डन चौकशी केली, “आता काय झाल या टवळीला?” मि. मार्टिन भोळसट चेहऱ्यान म्हणाला, “काय की बुवा!” आणि कामाला लागला त्या दोघानी त्याला न्याहाळल आणि एकमेकाकडे पाहिल. मिस् पेअर्ड जागची उठून बाहेर गेली. फिटवेलर साहेबाच्या कचेरीच्या बद दरवाज्यापुढून ती दबकत चालत गेली. आत बॅरोजबाई मोठमोठ्यादा गर्जत होती. पण तिच्या गर्जनाचा आज काही वेगळाच नूर होता. ती काय ओरडते आहे तें मिस् पेअर्डला कळूं शकल नाही. म्हणून ती परत आपल्या टेबलापाशीं जाऊन बसली.

सुमारें पचेचाळीस मिनिटानतर, मिसेस् बॅरोज, साहेबाच्या कचेरीबाहेर आली आणि स्वतःच्या कचेरीत घुसली. पाठोपाठ धाड्दिशी दार लावण्याला ती विसरली नाही. इतका तिच्या रागाचा पारा आज उच्च चढलेला होता. नतर जवळ जवळ अर्ध्या तासानतर फिटवेलरसाहेबानी मि. मार्टिनला बोलावणं धाडल. फाइलिंग खात्याचा हेड मि. मार्टिन, नीटनेटका, खालमान्या, आदबशीर आणि हुकुमासाठी कान टवकारलेला, गरीब मुद्रेनें साहेबापुढें जाऊन उभा राहिला. साहेबाच्या मुद्रेवर ‘नर्व्हसपणा’ दिसत होता. त्याचा ताबडा रग पार उतरला होता. नाकावरचा चष्मा काढून त्याच्याशीं त्यान चाळा आरभला. मग घशातल्या घशात एक खाकरा काढल्यासारखा केला. “मार्टिन,” साहेब म्हणाला, “आमच्याकडे तू गेली वीस वर्षे आहेस.” “बावीस, सर.” मार्टिननं दुरुस्ती केली. “एवढ्या वर्षांत,” साहेब पुढें म्हणाला, “तुझं काम

आणि—काय म्हणायच त्याला—एकूण वागण चांगलं रहात आलं आहे." "आपली कृपा, सर." मार्टिन लवून पुटपुटला. "माझ्या कल्पनेप्रमाणें मार्टिन, तू कधीं विडी पान सिग्रेट अथवा—म्हणजे—आणखी कशाचा नाद केल्याच ऐकिवात नाही." "बरोबर, सर." मार्टिनन विनम्र दुजोरा दिला. चष्म्याची भिंग पुसत साहेब आता म्हणाला, "हे सगळ छान जमल. आता मार्टिन, काल ऑफिसातून बाहेर पडल्यानतर तूं काय—काय केलस तें जरा सांग पाहू." उडालेल्या गोंधळापोटी मार्टिन जेमतेम क्षण अर्धा क्षणच गप्प राहिला. "सागतो की सर." तो लागलीच सावरत म्हणाला, "त्यात काय आहे न सागण्यासारख? मी चालत घरीं गेलो. मग रात्री जेवायला श्राफ्टच्या हॉटेलात गेलो होतो. जेवल्यानतर चालतच पुन्हा घरी आलो. रात्री जरा लौकरच आडवा झालो, साहेब. थोडा वेळ एक मासिक चाळल आणि अकरा वाजण्याआत झोपून गेलो." "हे सगळ छानच जमल." साहेब पुन्हा पुटपुटला. फाइलिंग खात्याच्या या हेडशी यापुढे बोलण्यासाठी किंचित्काळ त्यान शब्दाची शोधाशोध केली. अखेर तो म्हणाला, "हे पहा मार्टिन, — म्हणजे हे तुझ्यामाझ्यात बर का — तर, आपली मिसेस् बॅरोज — या मिसेस् बॅरोजन अलीकडे फार काम केल. फार म्हणजे अति काम केल. आणि त्यामुळ—सागायला वाईट वाटत— तिचा जोराचा नर्व्हस ब्रेकडाउन झाला आहे. म्हणजे काय आहे की, पर्सिक्युशन कॉम्प्लेक्स आणि जोडीला भयकर भ्रम अस काहीतरी तिच झाल आहे." "मलाहि वाईट वाटत, सर." मार्टिन हळहळत उद्गारला. साहेब म्हणाला, "वाईट वाटत,पण इलाज नाहीं. तिला असा भ्रम झालाय् की काल रात्री तू तिच्याकडे गेलास—म्हणजे तिच्या बिऱ्हाडी. आणि एकदरीनें—म्हणजे—थोडक्यात, वाईट वागलास. वागू नये असा." एकीकडे साहेबानं, वेदनायुक्त मुद्रेनें काहींतरी बोलू पहाणाऱ्या मार्टिनला हातान गप्प केला. आणि तो आणखी पुढें म्हणाला, "या मानसिक रोग्याच असंच होतं मार्टिन. भ्रम होतात. माणस अगदी असभाव्य वाटणाऱ्या

आणि—एकंदरीने—बावळट माणसांवर कांहीतरी ठपका ठेवतात. फार गुतागुंतीचे असतात हे मानसिक विकार. आत्ताच मी माझे मानसशास्त्रविशारद डॉक्टर फिच—त्यांना फोन केला होता. ते तस निश्चित असं काही सागायला तयार नव्हते, पण जे काही ते सर्वसाधारण स्वरूपाचच बोलले त्यान माझा सशय पक्का झाला. मीं सुचवलं तिला—मिसेस् बॅरोजला–तिन तें सगळ सागून टाकल्यावरच अर्थात्—की डॉक्टर फिचकडे तिन जाव हें बर. तिच वागणच मुळी तिचा विकार ओरडून सागत होत. पण परिणाम उलटाच झाला मार्टिन. ती जास्तच पिसाळली. आणि 'त्या हलकटाला समोर बोलवा'—म्हणजे—औ- च्!—तुला, अस दरडावू—म्हणजे आपली विनंति करू लागली. तुला कल्पना नसेल, मार्टिन, पण तुझ्या खात्याची आमूलाग्र पुनर्घटना करण्याचा तिचा विचार होता, म्हणजे मी समति दिली असती तरच, अर्थात् पण यामुळेच विकार बळावताच प्रथम तूच तिच्या टाळ—डोक्यात आलास पण बाकी तें आपण तरी काय सागू शकणार म्हणा? खरखोट डाक्टर फिचच ठरवू शकतील. तेव्हा मार्टिन, बाईचा उपयोग यानतर इथ होईल अस दिसत नाही." "फार वाईट झाल, सर." मार्टिन गदगदला.

याच क्षणी कचेरीचा दरवाजा गॅसच्या नळीचा स्फोट व्हावा तसा धडाड्दिशी उघडला आणि बॅरोज आत येऊन दणकली. ती किंचाळली, "काय म्हणतो हा पाजवा उदीर? नाही म्हणतो? कसा नाही म्हणतो तेच पहाते! धडगत नाही आज त्याची!" मि. मार्टिन जागचा अल्लद उठून सावधपणे सरकत साहेबाच्या खुर्चीपलीकडे जाऊन उभा राहिला. बॅरोज डरकाळली, "माझ्या खोलीवर चिरूट नाही ओढलास तू? व्हिस्की नाही प्यायलास? फिटवेलर साहेबाना 'वृद्ध कपि' नाही म्हणालास तू? फिट्टू म्हणून नाही उल्लेख केलास त्याचा? गळ्यास्तवर हेरॉइन घेऊन साहेबाची वाट लावण्याची भाषा नाही केलीस तूं? बोल!—बोल

कीं ! बोल आतां हिंमत असली तर !" श्वास घ्यायला बाई जरा थाबली आणि तिच्या गरगरत्या डोळयात नवी ठिणगी पेटली. "हलकट मेला ! असा बोटभर आकाराचा रडतोड्या मुडदा नसतास तर सगळा कट केलाय्स तू असंच म्हटलं असतं मीं ! कॅंटबर्ड सीटमध्यें बसलोय् म्हणे ! आणि वर जीभ काढून दाखवलीस मला ! अं ? सांगितल तर जळळ कुणी विश्वाससुद्धां ठेवणार नाहीं ! हें— हेंसुदा आगाऊच ठाऊक असणार तुला ! नक्की कटच होता तुझा ! कटच होता कोल्हा मेला !" हातवारे करून, वेडीखुळी होऊन, पोटातिडकीनें बाई एकसारखी किचाळत होती. सतापाची नवी लाट तिच्या पोटात फुटली. फिटवेलरसाहेबाकडे तिन डोळे वटारून जळ-जळीतपणे बघितल. "मूर्ख माणसा, हा इसम आपल्याला बनवतो आहे एवढ कस नाही कळत तुला ? त्याचा डाव कसा नाहीं लक्षात येत तुझ्या ?" पण फिटवेलरसाहेब सार काही लक्षात आल्यासारखे टेबलाखालची सर्व बटनं जोरजोरान दाबीत होते. 'एफ. ॲंड एस्.' च सार ऑफिस साहेबाच्या कचेरीत भराभरा जमा झाल. भराभरा साहेब ऑर्डरी देऊ लागले, "स्टॅाक्टन, तुम्ही आणि फिशबेन मिळून बॅरोजबाईना त्याच्या घरी पोचवा. मिसेस् पॅावेल, तुम्ही याच्या-बरोबर चला." स्टॅाक्टन तसा शाळेंत असताना थोडाफार फुटबॅाल खेळलेला गडी होता. मि. मार्टिनच्या अगावर चालून आलेल्या बॅरोज-बाईची त्यान वाटेतच कोडी केली. त्यान आणि फिशबेनन मिळून मोठ्या शिकस्तीन आणि मेहेनतीन बाईला कचेरीबाहेर नेल. बाहेर हॅालमध्यें स्टेनोग्राफर्स आणि ऑफिसबॅाइजची झुड हें पहायला जमली होती. बाहेर आली तरीसुद्धा बॅरोजबाई मि. मार्टिनची आईमाई उद्धरीतच होती. त्याच्याबद्दल उलटसुलट आरोप करीतच होती. त्याला तोडाला येतील त्या शिव्या घालीतच होती. शेवटीं हा सारा गोंधळ थेट बाहेरच्या दारापर्यंत आणि मग दाराबाहेर गेला.

फिटवेलरसाइेब विरक्तपणें एक मोठा उसासा सोडून मि. मार्टिनला म्हणाले, "मार्टिन, झाल हें फार वाईट झाल एकूण. पण हे सगळ तू विसरून जा असच मी तुला सागेन." "येस् सर." मि मार्टिन पुटपुटला. माग दाराच्या दिशेनं सरकला. सरकताना म्हणाला, "मी विसरून जाईन सर." तो बाहेर गेला साहेबाच्या कचेरीचा दरवाजा त्यान मार्गे काळजीपूर्वक लावून घेतला. हॉलमधून तो निघाला तो तुरतुरत्या, चपळ चालीनं. पण त्याच्या खात्यात शिरला तोवर त्याची चाल मूळ पदाला आलेली होती. तसाच तो अत्यत धीमेपणे मग आपल्या टेबलाशी गेला, 'डब्ल्यू २०' क्रमाकाच्या फायलीत त्यान आपली लाव मान खुपसली आणि तिच्यात बुडून गेल्यासारखा मि. मार्टिन पहाता पहाता दिसू लागला.

* * *

## जॅक लंडन (१८७६ ते १९१६)

अमेरिकेंतला विख्यात कथाकार, कादबरीकार. याच्या कथादेखील छोट्या कादबरीच्या आकाराच्या आणि तितक्याच सामर्थ्यशाली आहेत. कॅलिफोर्नियातल्या सान्फ्रान्सिस्को शहरी हा जन्मला. बालपण भणंग वातावरणात गेलें. भूक, कष्ट या गोष्टीची तेव्हापासून सवय. पुढे त्याच्या मनानें पुस्तकाच्या दुनियेची गोडी घेतली. साहसाच्या कथा, प्रवासाचीं वर्णनें, शोध आणि सशोधक यात त्याच्या चित्तवृत्ति एक अवीट आनंद अनुभवू लागल्या. तरुण वयात अनेक रोजगार केले. अखेर, कष्टानी नव्हे तर बुद्धीनें जगायचें त्यानें ठरवलें. दिवसाचे एकोणीस–एकोणीस तास अभ्यास आणि रोजगार करून तो कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीत दाखल झाला. परतु कौटुंबिक गरजेपोटी वर्षभरातच ती जिद्द सोडावी लागली. १८९६ मध्यें क्लॉनडाइकमध्यें सोन्याचा शोध लागला आणि मग जगभर सोन्यासाठीं जी धावपळ झाली तिच्यात लडनहि सामील झाला. त्याच्या हातीं औसभर देखील सोनें न लागलें तरी अनुभवाचा सपन्न ठेवा त्याला या निमित्तानें सापडला. १९०३ मध्यें त्याचें पहिलें पुस्तक ‘कॉल ऑफ द वाइल्ड’ प्रसिद्ध झालें. अमेरिकेंतली नियतकालिके मग लडनच्या कथा छापू लागली. लडननें आता लेखन हाच व्यवसाय पत्करला. ‘सन ऑफ द वुल्फ’ (१९००), द सी वुल्फ (१९०४), हे त्याचे दोन नावाजलेले कथासग्रह. यानतर कथाकार म्हणून लडन एवढा लोकप्रिय झाला की केवळ या व्यवसायाच्या जोरावर त्याचें आयुष्य सपन्नतेंत आणि सुबत्तेंत गेलें. प्रस्तुतची त्याची ‘टु बिल्ड अ फायर’ ही कथा अमेरिकेंतल्या लोकोत्तर कथावाङ्मयात जमा होण्यायोग्य असल्याचें टीकाकाराचें म्हणणें आहे. शून्याखालीं ऊष्णतामान कित्येक अशांनीं उतरलेल्या प्रदेशांत अस्तित्वासाठीं एकट्या एका माणसानें दिलेला शिकस्तीचा झगडा या कथेंत मोठ्या तन्मयतेनें रंगविला आहे.

# ज ना प र

दिवस उगवला तोच गारठ्यान भरलेला आणि कुद. भारी गारठा. आणि कुंदपणा तरी किती. युकॉनच्या मुख्य सडकेवरून तो मुशाफिर एक उंच टेकाडावर चढला. त्या टेकाडावरन एक पुसट पाय-वाट पूर्वेकडे गेली होती– लठ्ठ लठ्ठ 'स्प्रूस'च्या राईतून. चढ भलताच होता. टोकाशी मुशाफिर जरा दम खाण्यासाठी थाबला. निमित्ताखातर त्यान उगीच मनगटावरल्या घड्याळाकडे पाहिल. नऊ वाजले होते. सूर्य दिसत नव्हता, त्याची वर्दी देणारी उन्हाची पुसट तिरीपदेखील कुठ अस्तित्वात नव्हती. आणि तस म्हटलं तर आभाळ पहाव तर निरभ्र होत. औषधालादेखील ढग नव्हता. उघडीप होती; पण आसमतावर कसल तरी अदृश्य पांघरूण पडल्यागत सार गुडुप्प झाल होत.

वातावरण कस उगीच उदास वाटत होत. त्यान दिवस अधारल्यागत झाला होता. सूर्यदर्शन नसल्यान अस झाल होत. त्या मुशाफराला याच काही वाटल्याच दिसत नव्हत. सूर्यदर्शन नसण्याची त्याला सवयच होती. सूर्य अखेरचा दिसून आता बरेच दिवस उलटले होते, आणि तो पुन्हा दिसायचा तर अजून थोडे दिवस उलटायला हवेत हें त्याला चागलं ठाऊक होत. मग एक दिवशी दक्षिणेकडे तो तेजाचा गोळा क्षितिजावर डोकावला न डोकावलासा होऊन पुन्हा एकदा अस्ताला जाणार होता.

आल्या वाटेकडे त्या मुशाफरान एकदा माग, लाबवर नजर फेकली. मैलभर रुदीच युकॉनच पात्र तीन फूट जाड बर्फाच्या थराखाली दडल होत. या बर्फावर तितकाच जाड हिमाचा थर पसरला होता. हें हिम अगदी धुवट पाढर होत. बर्फ घट्ट गोठून जिथ त्याचा तुबा झाला होता तिथ या हिमाच्या नितळ लाटा तयार झाल्या होत्या. उत्तरेकडे, दक्षिणेकडे नजर पोचेल तिथवर सार पाढर फेंक होत. त्यात उठून दिसत होती काळी सूक्ष्म रेषा, स्प्रूसच्या रायानी झाकलेल्या बेटाला वळसा घालून ही रेषा दक्षिणेकडे वळवळत गेली होती आणि तिथनं वळून उत्तरेकडे पोचली होती, आणखी एका, स्प्रूसच्या रायाच्या बेटामागें लुप्त झाली होती. ही रेषा होती वाटेची. मुख्य वाटेची. दक्षिणेकडे पाचशें मैलावरच्या चिलकूट खिंडींत ही पोचली होती. खाऱ्या पाण्याशी पोचली होती. तिथून निघून उत्तरेकडे हजारभर मैलावरच्या नुलातोला जाऊन भिडली होती, बेरिंग समुद्रावरच्या सेंट मायकेलपर्यंत तिचा विस्तार पसरला होता. म्हणजे हा सुमारें अडीच हजार मैलाचा पल्ला होता.

असं होत तरी— म्हणजे ती सडकेची लाबच लाब पसरलेली गूढ काळी रेषा, आभाळातला मनस्वी कुदपणा, झोंबणारा गारठा, आणि साऱ्या वातावरणाला आलेला आगळेपणा, विचित्रपणा— हें सगळ अस असूनहि याचा त्या मुशाफरावर कांहींहि परिणाम झाला नव्हता. याचा

अर्थ, तो या परिस्थितीत पक्का मुरला होता, सरावला होता असा मुळीच नव्हता. तस म्हटल तर या मुलखात तो नवाच होता, उपरा होता. हा त्याचा या भागातला पहिलाच तर हिवाळा होता. आणि त्याच्या बाबतीत वाईट हें होत की त्याला मुळी कल्पनेची झेपच नव्हती. रोखठोक व्यवहारात तो सराईत होता, सावधचित्त होता. पण फक्त व्यवहारातच. त्या व्यवहारात बर काय, वाईट काय, त्याचा अर्थ काय, त्याच महत्त्व किती, याची जाण त्याला मुळीच नव्हती शून्याखाली पन्नास अंश ऊष्णतामान म्हणजे सुमारें ऐंशी अंश एवढ धुक. आता या वस्तुस्थितीचा अर्थ त्याच्या लेखी एवढाच होता की, ही हवा फार थंडगार आहे, हाडी भिडणारी, बेचैन करणारी आहे. बस्स. एवढच. माणूस म्हणून आपण अखेर कसे हवामानापुढें शरण आहोत, एकदरीने माणूसच किती दुबळा आहे, उष्णतेच्या आणि थडीच्या केवळ मर्यादित आवाक्यातच तो कसा जगू शकतो, यातल काहीहि त्याच्या मनाला शिवल नाही. त्याच्या मनात माणसाच्या मर्त्यतेचा विचार आला नाही आणि या विश्वातल माणसाच स्थान काय याचाहि प्रश्न त्याला पडला नाही. शून्याखाली पन्नास अंशाना,अंगी फुटणारी चावरी थडी एवढच त्याच्या लेखी अर्थ होता. आणि या चावऱ्या थडीचा बदोबस्त गरम कपडे, कानटोपी, जाड मोजे, याच्या उपयोगानं त्यान केला होता. शून्याखाली पन्नास अंश म्हणजे त्याच्या दृष्टीन हें एवढच होत. याला याहून काही व्यापक अर्थ असेल, हें मुळी त्याच्या डोक्यातच आल नव्हत.

पुढें जाण्याकरता तो वळला आणि अदाज घेण्याकरता थुकला. थुंकीचा कडक आवाज झाला त्यानं तो चमकला. तो पुन्हा थुकला. आणि पुन्हा हवेंतच, बर्फावर पडण्याआधीच, थुंकी कडकडली. शून्याखालीं पन्नास अंश हवामान उतरलं म्हणजे बर्फावर थुंकी अशी कडक वाजते हें त्याला ठाऊक होत. पण या खेपेला थुंकी हवेंतच कडक झाली होती, वाजली होती. म्हणजे पन्नास अंशाखालींहि हवामान सरकलं होत एवढ त्यानं जाणलं. तें आणखी किती खालीं सरकलं होत हें त्याला माहीत

नव्हत. पण त्याचं त्याला मोठंसं नव्हतंही.त्याच्या मनात तो प्रश्नच नव्हता. हेण्डर्सन क्रीकच्या डाव्या अंगावरल्या त्याच्या जुन्या जमिनीकडे तो निघाला होता. त्याचीं माणसं आधीच तिथं पोचलीं होती. इडियन क्रीकच्या भागातल्या मधल्या घळीतनं ती तिथं पोचलींदेखील होती. तो मात्र या लाबच्या वाटेन आला होता. युकॉन नदीतल्या बेटावरून वसतात लाकूड बाहेर नेता येईल का ह्याचा अदाज घेण्याकरता आला होता. सहाच्या सुमाराला, म्हणजे काळोख पडल्यावरच तो मुक्कामाला पोचणार होता हें खर, पण त्यात काय बिघडणार होत? बाकीचीं सारी आधीच तिथ पोचलेली असणार होती. शेकोटी, गरमागरम जेवण, सार तयार असणार होत. जेवणाची आठवण झाली तशी त्यान जाकिटा-खालच, फुगून बाहेर डोकावणार पुडक हातान दाबून घेतल. आताच्या जेवणाची सोयदेखील त्यान करून घेतली होती. शर्टाच्या आत हातरुमालात बाधलेली बिस्किट पोटाशी धरलेली होती. ती थंडीन कडक न व्हावीत, गोठूं नयेत यासाठी एवढाच उपाय होता, तीं अगाशी घट्ट धरून ठेवणं. त्या उबेन तीं गरम ठेवण. बिस्किटाच्या आठवणीन त्याच्या मुद्रेवर स्मित उमटल. प्रत्येक बिस्किटात बेकन ग्रीज भरल होत आणि शिवाय सोबत फ्राइड बेकनचा एकेक जाडजूड तुकडा होताच.

तो आता स्प्रूसच्या एका गर्द राईत उतरला. वाट पुसट झाली होती. शेवटची घसरगाडी गेली त्यानतर चागला फूटभर जाड बर्फाचा थर वाटेवर बसला होता. आपण घसरगाडी न घेता, पायीच सुटसुटीत आलो याच त्याला आता फार बर वाटल. पोटाशीं बाधून ठेवलेलीं बिस्किट सोडली तर त्याच्याकडे ओझ अस कसलच नव्हत. गारठ्याच्या कडाक्यान मात्र तो चागलाच स्तिमित झाला होता. हातमोजा घातलेल्या पंज्यानं आपलं बधिर नाक आणि गालफड चोळता चोळतां त्यान मनाशीं कबूल केलं की थडी खरच जास्त आहे. तसा तो चागला गलमिशावाला माणूस होता. त्याच्या गलमिशादेखील घसघशीत होत्या. परंतु चेहऱ्या-वरच्या त्या केसानी त्याचीं उंचेलीं गालफड पुरती झाकली जात नव्हतीं

आणि आक्रमकपणें पुढे आलेलं लांब नाकदेखील गारठ्यात उघडच पडलं होतं.

त्या मुशाफिराच्या पायाला लगटून लगटून एक कुत्रा दुडक्या चालीनं चालत होता. कुत्रा गावठी होता, बांध्यानं मोठाड होता. लांडग्यासारखा हुबेहुब दिसत होता. भुरा तपकिरी गडद रंग. आणि जंगली लांडग्याचा उग्रपणा. कमालीच्या गारठ्यानं तें जनावर हुडहुडलं होतं. हा प्रवासाचा मोसम नाहीं, हे त्याला कळत होतं. माणसापेक्षा त्याची या बाबतीतली धारण–शक्ति तीव्र होती. जाण अचूक होती. प्रत्यक्षात ऊष्णतामान शून्याखाली पन्नास अंश नव्हे तर चांगलं साठसत्तर अंश तरी होतं. नक्की सांगायचं तर पचाहत्तर अंश खाली होतं. शून्यावर बत्तीस अंश म्हणजे 'फ्रीझिंग पॉइंट' मानला जातो. म्हणजे एकशेसात अंश तरी हिम पडलेलं होतं. त्या मुक्या जनावराला ऊष्णतामानमापक यंत्राची काय माहिती ? माणसाच्या मेंदूप्रमाणं, गारठा, फार गारठा, खूपच गारठा अशीं गारठ्याची प्रमाणं ठरविण्याची व्यवस्था त्याच्या मेंदूत नसेलहि कदाचित्, परंतु त्याची जाण मात्र तीव्र होती, आणि म्हणून सगळ्या गोष्टीचा अचूक 'वास' त्याला होता. या वासानंच की काय, ते मुकं जनावर मनोमन धसकलेलं होतं आणि शेपटी घालून खाल-मानेनं धन्याच्या पायांत लडबडत चाललं होतं. धन्याच्या पायाची एकहि वेडीवाकडी हालचाल त्याला थबकून संशयात पाडत होती. त्याच्या मनी एकच उत्कट इच्छा होती की, धन्यानं आपल्यासकट कुठं तरी निवाऱ्याला जावं, वस्तीला जावं आणि गरमागरम शेकोटी पेटवावी शेकोटी म्हणजे काय तें परिचयानं त्याच्या चांगलं माहितीचं होतं आणि त्याला शेकोटीच हवी होती. ती नसेल तर निदान एखाद्या जागी बर्फ उकरून, अंगाचं मुटकुळं करून, मुकाट पडून अंगातली असली नसली ऊब वाचविण्याची त्याची इच्छा होती.

श्वासोच्छ्वास गोठून त्याच्या हिमाचा कणीदार पातळ थर त्याच्या अंगावर बसला होता. विशेषतः नाक, जबडा, डोळ्याच्या पापण्या,

श्वासातल्या या हिमाच्या थरानं शुभ्र रेखून, रंगून निघाल्या होत्या. त्याच्या धन्याची पिंगट दाढी आणि मिशीदेखील अशीच हिमानं रंगून निघाली होती. तिच्यावरचा थर तर चांगलाच दाट होता. हिमाचं गोठून बर्फ बनलं होतं. गरम, दमट श्वासागणिक तें वाढत होतं. जबड्यांत तमाखू होता, आणि ओठावरचं बर्फाचं पलिस्तर असं कडक बसलं होतं, कीं चोथा थुकताना हनुवटी कोरडी करणं अशक्य होत होतं. परिणामीं लालसर, जाड, दाट अशी वाढत्या लांबीची कणीदार दाढी त्याच्या हनुवटीवर जमत होती. तो तोंडघशी पडला असता तर ही दाढी कांचेच्या वस्तूप्रमाणं फुटून चूर झाली असती. तिच्या असंख्य कपच्या उडाल्या असत्या. पण या उपऱ्या गोष्टीचं त्या मुशाफराला मोठंसं ओझं वाटत नव्हतं. त्या भागांत तमाखूबाजांना या गोष्टीची सवयच ठेवावी लागे. आणि अशाच कडाक्याच्या थंडींत मागं दोनदा त्याला असा उघड्यावरून प्रवास करावा लागला होता. अर्थात् तेव्हांची थंडी इतकी कडक नव्हती हें खरं, पण वाटेंत लागलेल्या ऊष्णतामानमापक यंत्रावर एकदा शून्याखालीं पन्नास आणि एकदा पंचावन्न अंश उष्णतामान उतरल्याचं त्यानं पाहिलं होतं.

अनेक मैल तो मुशाफिर जंगलातल्या सपाटीवरून पाय उचलीत चालत राहिला. एकदा मोठी घळ त्यानं ओलांडली आणि छोट्या ओहोळाच्या गोठल्या पात्राशी तो पोंचला. हा होता हेण्डर्सन क्रीक खाडीपासून सुमारें दहा मैलांवर आपण आलों आहोंत हें मुशाफिरानं हेरलं. त्यानं घड्याळावर नजर टाकली. दहा वाजले होते. ताशीं चार मैलाच्या वेगानं त्याची वाटचाल चालली होती. या वेगानं साधारणपणे साडेबाराच्या सुमाराला आपण खाडीशीं पोंचूं असा अंदाज त्यानं बांधला. तिथं पोंचताच जवळची बिस्किटं खाऊन वेळ भागवायची असं त्यानं ठरवून टाकलं.

त्यानं पुन्हा पाऊल उचललं आणि कुत्रा पुन्हा शेपटी घालून मागें मागें येत त्याच्या पायांत लडबडू लागला. नव्या वाटचालीच्या कल्पनेनं,

उबेला, निवाऱ्याला आसुसलेलं तें जनावर पुन्हा नाउमेद झालं होत. घसरगाडीची जुनी चाकोरी आता स्पष्ट दिसत होती. पण अखेरच्या निरोप्याची पावलं मात्र फूट-फूटभर जाड बर्फाच्या थराखाली पार बुजून गेली होती. गेल्या महिन्याभरात त्या निर्जन घळींतून कुणी फिरकलं नव्हतं. मुशाफिर धीम्या चालीनें पुढें जात राहिला. विचार करण्याची त्याला मुळातच फारशी आदत नव्हती, आणि त्या विशिष्ट वेळीं तर त्याच्या मनात, खाडीशी पोचलं म्हणजे जवळचीं बिस्किटं खायची, आणि मग पुढें सध्याकाळी सहापर्यंत मुक्कामावर आपल्या माणसात पोचायच, एवढा एकच विचार एकसारखा घोळत होता बोलायला दुसर कोणी तिथं नव्हत, आणि असत तरी, तोंडावर बसलेल्या बर्फाच्या पलिस्तरान बोलण अशक्य झाल असत. म्हणून तो मुशाफिर मग तोंडातल्या तमाखूचा पुन्हा पुन्हा, घोळघोळून रवथ करीत राहिला आणि त्याची लाल तपकिरी दाढी वाढतच राहिली

मधूनच तो जुना विचार स्वतःच्र अस्तित्व नव्यान भासवून देत होता. गारठा फार आहे असा गारठा कधी पडला नव्हता. चालता चालता मुशाफिर हातमोजा घातलेल्या पज्याच्या पाठीन गालफड चोळत होता, नाक चोळत होता हे अगदीं अभावितपणें घडत होत. एकदा एका आणि एकदा दुसऱ्या पज्यान घडत होत पण किती चोळलीं तरी, चोळायची थाबवली की गालफड सुनी पडत होती, पाठोपाठच्या क्षणी नाकाचा शेंडा सुना पडत होता गालफड थडीन चागलीच फुट-णार, तिथल रक्त गोठणार हे त्याला पक्क माहीत होत. असल्या थडीत 'बड्' वापरीत असे तस नाकावरच आच्छादन आपण करून घेतल नाही याची बारीक रुखरुख सारखी त्याच्या मनात खुपत होती. हे आच्छादन नाकावरून गाल झाकून कानामागें गेलं असत. गालफडाच घिरड व्हायच मग टळल असत. पण आता त्याची आठवण होऊन, हळहळ वाटून काय उपयोग होता, म्हणा! गालफड थडीन फुटली असती

तर होऊन होऊन काय झाल असतं ? थोडासा त्रास झाला असता, वेदना झाली असती. पण इतकच. याहून मोठंसं काहींच होणार नव्हत.

मनात विचारच नाही म्हटल्यावर मुशाफिर चालताना फार सावधचित्त होता, आसपासच्या भागावर बारीक लक्ष ठेवून होता, हें वेगळं सागण्याची आवश्यकताच नाहीं. घळीत झालेले बदल त्यान नजरेनं टिपले होते. चढ, उतार, वाकण, अडथळे, खड्डे, सार काही तो अचूक हेरत होता पाऊल टाकण्याआधीच हें सार त्याच्या नजरेत भरत होत. एकदा, एका वाकणावरन येताना,घोडा बिचकावा तसा तो जागच्या जागी बिचकला, एक मोठ वळण घेऊन बाजूला झाला, आणि आल्या वाटेन काही पावल माग गेला. घळीत खालवर बर्फच बर्फ साचल होत हे त्याला ठाऊक होत. तसल्या थडीत तिथ पाणी साचून रहाण शक्यच नव्हत. त्या भागात कुठच ते साचलेल रहाण शक्य नव्हत. तथापि दुशीकडल्या टेकाडातून छोटे छोटे झरे उचबळून बर्फाखालून वहात असत हें त्याला माहीत होत. थडीच्या कितीहि कडाक्यात हे जिवत झरे गोठतच नाहींत आणि मोठे धोक्याचे ठरतात याची कल्पना त्याला होती. त्याचे सापळे तयार होत. बर्फाखाली पाण्याची मोठमोठी डबकी साचत. कधी ही तीन इच खोल तर कधी तीन तीन फूट खोल असत. काही वेळा बर्फाचा थर फक्त अर्धा इचच जाड असायचा. त्यावर हिमाचा पापुद्रा जमलेला असायचा. कधीं कधी तर बर्फ आणि पाणी याचे थर एकमेकावर साचलेले असत. मग चुकून माणूस त्यात फसला की काही वेळ हे एकाखालचे एक थर फोडीत खालीं खाली जायचा आणि कित्येकदा कमरेपर्यत पाण्यात बुडायचा.

म्हणूनच मुशाफिर आता एवढा बिचकून बाजूला झाला होता. पायाखाली हिम खचताना त्याला जाणवलं होत. त्याखालचा बर्फाचा पापुद्रा फट्दिशीं दुभंगल्याच त्याला कळल होतं. असल्या जबर गारठ्यात पाय गार पाण्यात बुड्डू देण म्हणजे आफतच होती, सकट होत. निदान पुढं

वाटचाल करण्याला त्यामुळें विलंब लागला असता. कारण मग थांबावं लागल असतं, शेकोटी जमवून पेटवावी लागली असती आणि तिच्या उबेंत पायातले बूट, मोजे काढून वाळवावे लागले असते. उभ्या उभ्या मुशाफिरानें पायाखालची वाट नीट न्याहाळून पाहिली, दुतर्फा अवलोकन केल आणि अस ठरवल की पाण्याचा प्रवाह उजवीकडून येत असला पाहिजे. काही क्षण त्याने गालफड आणि नाक घसघसा चोळीत थोडा विचार केला. मग तो डावीकडे सरकू लागला. पावला पावलाला पायतळीची जमीन अजमावून पाहू लागला. धोका टळला अस वाटल्यावर, त्यान तोंडातल्या तबाखूचा नव्यानें रवथ सुरू केला आणि ताशी चार मैल वेगाची मजल दरमजल पुढे सुरू झाली.

पुढल्या दोन तासात, असले अनेक सापळे त्याच्या वाटेंत आले. सर्वसाधारणपणें, लपल्या पाण्यावरचा हिमाचा थर,पहाता क्षणी काहीसा खचलेला, खोलगट भासतच असे. धोक्याची आगाऊ कल्पना मिळत असे. तरीहि एकदा मुशाफिर खचता खचता बचावला. आणि एकदा त्याला स्वतःला अदाज न मिळाल्यान, कुत्र्याला त्यान पुढ चालायला लावल.कुत्रा जाण्याला राजी नव्हता. मुशाफरानं पुढं ढुसकीपर्यंत तें जनावर दाढून जागच्या जागींच उभ राहिल. मग मात्र तरतरा पुढल्या शुभ्र,अखड जमिनीवरून चालत गेल. मध्येंच खालीं खचल, धडपडून बाजूला सरल आणि कसबस पक्क्या भुईवर येऊन उभं राहिल.त्याचे पुढले पाय पाण्यात भिजले होते.त्याना लगटलेल्या पाण्याच पहाता पहाता गोठून बर्फ झाल.पायावरून तें निपटून टाकण्यासाठी कुत्र्यान भराभरा जिभेनें प्रयास केले, मग हिमात बसून दातानी तें पज्यामधल तें बर्फ ओरबाडून काढूं लागल. ही उपजत जाणच त्या मुक्या प्राण्याला होती. बर्फ तसच राहू दिल तर पजे फुटणार होते, त्याची सालडीं निघणार होतीं. त्या कुत्र्याला हें काहीं माहीत नव्हतं, परतु कोणीतरी आतून सागाव, सुचवावं तस त्यान सार केल. मुशाफिराला मात्र हे माहीत होत. अनुभवानं त्यान हे ठोकताळे बांधलेले होते. त्यान उजव्या हातातला मोजा काढला आणि पायांवर साच-

लेले बर्फाचे कण बोटांनीं ओरबाडून काढण्याला भराभरा सुरुवात केली. पुरतीं मिनिटभरदेखील त्याचीं बोट या निमित्तान उघडी राहिलीं नसतील, पण तेवढ्यात ती पार सुनीं सुनीं पडलीं. त्याला याच मोठं नवलं वाटल. घाईनंच त्यानं मोजा हातात सरकवला आणि छातीवर फडाफडा तो हात आपटून घेतला.

माध्यान्ही बारा वाजले तसा दिवस चकचकीत उजळला.पण सूर्य मात्र लाब दक्षिणेकडे होता.त्याची हिंवाळी कक्षा आक्रमीत होता. त्याचा प्रकाश क्षितिजापर्यंत पोचूच शकत नव्हता. भुईचा मोठा उचवटा सूर्य आणि हेण्डर्सन क्रीकच्या मध्यें येत होता. मुशाफिर चालला होता तिथ आभाळ स्वच्छ होत. सावली पडत नव्हती.बरोबर साडेबाराला तो खाडीशीं पोचला. आपण चागलेच वेगानं आलो या विचारानं त्याला समाधान वाटल. याच वेगानं गेलों तर सहापर्यंत मुक्काम गाठण्याला हरकत नाहीं असहि त्याला वाटलं. त्यानं जाकिटाच्या आणि शर्टाच्या गुब्या सोडल्या. आणि आतलं पुडक बाहेर काढल. सुमारें पाव मिनिटात हे त्यानं केलं असेल, पण तेवढ्या अल्प काळातदेखील मोज्याबाहेर काढलेल्या पज्याच्या बोटाना बधिरपणा आला. मग त्यानं तो पंजा मोज्यात घालण्याऐवजीं पायावर त्याचे दहाबारा तडाखे दिले. बर्फान आच्छादलेल्या लाकडाच्या एका ओडक्यावर तो बिस्किट खाण्यासाठी बसला. पायावर तडाखे मारून हाताला आलेल्या झिणझिण्या एवढ्यात कुठच्या कुठें नाहीशा व्हाव्यात, याच त्याला नवल वाटल. मग पुन्हा पुन्हा त्यान बोटाचे फटके अगावर मारण चालवल. तो उघडा हात मग त्यान मोज्यात सरकवला. आणि खाण्यासाठी दुसरा उघडा केला. एक घास त्यानं घेण्याचा प्रयत्न केला, पण तोडाला तर बर्फाचं कडक पलिस्तर बसलं होत. शेकोटी पेटवून, अगावरचं बर्फ प्रथम वितळवून घालवायलाच तो विसरला होता. आपल्या खुळेपणाच त्याला आतां मनोमन हसू आलं. आणि तस हसत असतानाच, उघड्या पज्याच्या बोटांना येऊं लागलेली वाढती बधिरता त्याला जाणवली.

बसल्या वेळी पायाच्या अगठयातून येत होते ते वेग आता ओसरत होते हेंही त्याच्या लक्षात आल. अगठ्याना अजून ऊब आहे की ते बधिर पडले आहेत तें त्याला नीटस कळेना. म्हणून बुटातल्या बुटात त्यान ते हलवले आणि त्याला कळल की ते बधिर झाले आहेत.

घाईनच त्यान मोजे हातावर सरकवले आणि तो उठून उभा राहिला. तो जरासा घाबरलाच होता भराभरा तो एकेक पाय दणादण भुईवर आपटू लागला. पायात पुन्हा वेग येईतोवर त्यान हे केल. त्याच्या मनात विचार आला, थडी आहे खरी कडाक्याची. या भागात एकेकदा केवढी थडी पडते त्याच सल्फर क्रीकच्या त्या माणसान केलेल वर्णन खरच होत त्या वेळीं मात्र आपण त्याला हसलो होतो ! यावरून एवढंच सिद्ध होत की, माणसान फार दमात जाऊ नये. सशयाला आता काही जागाच नव्हती, थडी निश्चितच होती. अगात पुन्हा ऊब जाणवेपर्यंत मुशाफिरान जागच्या जागी पायपीट केली, हाताची कवाईत केली. मग त्यान काड्याची पेटी बाहेर काढली आणि तो शेकोटी पेटविण्याच्या मार्गाला लागला. बर्फा-खाली, गेल्या वसतात साचलेल्या, पाण्यान आणून टाकलेल्या सुक्या काटक्या मिळाल्या त्याच त्यान जळण केल. प्रथम साध्या धुगधुगीपासून हळूहळू त्यान मोठ्या शर्थीन चागली तडतडती शेकोटी तयार केली. तिच्या मदतीन चेहऱ्यावरचा कडक बर्फ त्यान वितळवून टाकला आणि तिच्या उबेला बसून जवळची बिस्किट हजम केली. तेवढ्यापुरती तरी अवकाशातली सारी थडी त्याच्यापुढें निष्प्रभ झाली होती. शेकोटीन कुत्रादेखील सुखावला होता, पाय ताणून, अग ताणून शेकोटीच्या अगदी जवळ, पण अंगावर किटल न उडावीत इतका लाब तो सुखानें पसरला होता.

खाऊन सपल तशी मुशाफिरान पाइपमध्यें तमाखू भरला आणि तबियतीन त्याचे काही दम मारले. मग हातात मोजे घातले, कानटोपीचे बंद कानावरून घेऊन घट्ट बाधले आणि डाव्या अंगाकडल्या चढाची

वाट त्यानं धरली. कुत्र्याची फार निराशा झाली होती, त्याला शेकोटी सोडण्याची मुळींच इच्छा नव्हती. या माणसाला थडी काय चीज असते त्याची जणू दखलच नव्हती. म्हणून दिक्कतहि नव्हती. बहुधा त्याच्या पूर्वजाच्या अनेक पिढ्यानादेखील थडीची, कडाक्याच्या थडीची, शून्याखाली एकशेसात अश थडीची जाणीव आवर्जून कधी झालेली नसेल. पण कुत्र्याला ही जाणीव नक्कीच होती. वशपरपरा त्याला ही जाणीव असत आलेली होती. ही जाणीव त्याच्या रक्तात होती. असल्या भयकर गारठ्यात अनोळखी मुलुखातून फिरणं बर नव्हे हें त्याला समजत होत. या वेळी खर म्हणजे बर्फात खड्डा खणून आतल्या उबेंत गुरगुशी मारून बसायच, जिकडून थडी येई त्या बाजूला ढगाची भित उभी राहून, येणारी थंडी अडेपर्यंत वाट पहायची. कुत्रा आणि मुशाफिर याच्यात तसा मोठासा जिव्हाळा नव्हता. एक दुसऱ्याचा गुलाम होता, कामाच जनावर होता, इतकंच. त्या मुक्या प्राण्याच्या अगावरून धन्याचा प्रेमळ हात कधी फिरला नव्हता, बसले होते ते चाबकाचे फटकारे त्या जोडीला त्यान ऐकले होते फटकाऱ्याइतकेच झोबरे, धास्तावून टाकणारे परवलाचे आवाज–धन्याच्या तोडून निघणारे. म्हणूनच कुत्र्यान आपली भावना धन्याला कळविण्याची खटपट आता मुळीच केली नाही. धन्याच्या हिताहिताला तें बाधलेलं नव्हत, त्याबद्दल त्याला कोणतहि सोयरसुतक नव्हत. त्याला परत शेकोटीशी जावस वाटत होत तें स्वतःच्या सुरक्षिततेसाठीं. परतु धन्यान शीळ घातली, चाबकाची आठवण देणारे ते आवाज केले, आणि तें जनावर मुकाट धन्याच्या पायात लडबडत वाट कापू लागल.

मुशाफिरान तोंडांतल्या तमाखूचा एकदा रवथ केला आणि बर्फाची नवी दाढी त्याच्या तोडावर वाढूं लागली. त्याच्या दमट श्वासानी भराभरा त्याच्या मिशीवर, भुवयावर, पापण्यावर हिमाचा पाढरा थर जमा होऊ लागला. हेण्डर्सन्स क्रीकच्या त्या डाव्या कैचीवर फारसे झरे नव्हते. सुमारें अर्धा तास मुशाफिराला ते कुठेंहि पायरवले नाहींत. आणि

मध्येंच, नको तेंच घडल. कुठं कसल चिन्ह नव्हतं तिथच, वरचा अखड मऊ बर्फ आतला थर भक्कम असल्याचं सांगत होता तिथच, मुशाफिर खालीं खचला. खड्डा फारसा खोल नव्हता. गुडघ्याखालीं चार अंगुळ मुशाफिर चिंब झाला आणि बाहेर पक्क्या भुईवर पाय रोवून कसाबसा वर आला.

त्याला राग आवरत नव्हता आणि आपल्या नशिबाला त्यानं मोठ्यादा शिव्या घातल्या. सहापर्यंत तळावर आपल्या माणसांत पोंचूं अस त्याला वाटल होतं परतु आतां या प्रकारानं तासभर तरी उशीर होणार होता. कारण पुन्हा शेकोटी पेटवावी लागणार होती,पायमोजे,तुमान, बूट एवढ सार वाळवाव लागणार होत. तशा थंडींत हें गृहीतच होत. त्याला एवढ कळत होत. आता तो एका बाजूला टेकाडाकडे वळला आणि त्यावर चढला. वर, स्प्रूसच्या छोट्या छोट्या झाडाच्या बुध्याभंवताालच्या झाडो-ऱ्यात, उच चढलेल्या पाण्याबरोबर येऊन मागं राहून गेलेल्या वाळक्या काटक्या आणि फाद्या अडकून राहिल्या होत्या. त्याच्याबरोबर गतवर्षीच खुटखुटीत वाळकं गवतहि होत. मुशाफिरान त्यांतल्या त्यात मोठं जळण निवडून ते प्रथम बर्फावर टाकल. यान शेकोटीला पाया तयार झाला. ज्योत पेटवता पेटवता आता ती खालच्या बर्फात बुडणार नव्हती. ती बर्फाला लागली असती तर बर्फ वितळला असता. जळण ओल झाल असत. खिशातून काढलेल्या बर्चच्या तुकड्यावर काडी ओढून मुशा-फिरान शेकोटी शिलगावली. कागदापेक्षा अशी काडी लौकर पेटे. शेको-टीच्या पायावर ही ठेवून मुशाफिरान सुक्या गवतानं आणि छोट्या काटक्यानी शेकोटीला भर दिली.

अगदी खूप सावकाश आणि काळजीपूर्वक तो हें सर्व करीत होता. धोक्याची कल्पना त्याला होती. हळूहळू, शेकोटीन जीव धरला तशी त्यान काटक्याचा आकार वाढवला. तो बर्फात बैठक मारून बसून काटक्या झाडोऱ्यातून एकेक करून सोडवून सरळ शेकोटींत टाकूं

लागला. हें काम न जमून चालणार नव्हत, यात अपेश खपणार नव्हत, हें त्याला ठाऊक होत. शून्याखालीं पचाहत्तर अश ऊष्णतामान उतरल्यावर शेकोटी पेटविण्याच्या कामी माणसाला अपेश येऊन चालणारच नव्हत—विशेषतः त्याचे पाय बर्फगार पाण्यान चिब भिजले असताना तर मुळीच चालणार नव्हत. पाय कोरडे असते, आणि शेकोटी जमली नसती तर, तो पुढें अर्धा मैल पायवाटेन धाव मारू शकला असता आणि या प्रकारे त्याला अगात ऊब ठेवता आली असती. परतु ओल्या आणि गोठत्या पायात, धावूनदेखील ऊब आणता आली नसती. ऊष्णतामान शून्याखाली पचाहत्तर अश होत ! किती पळालं तरी पाय जास्त जास्तच आखडले असते !

हेंहि सार त्या मुशाफिराला समजत होत सल्फर क्रीकवर पूर्वापार रहाणाऱ्या त्या माणसान यासबधात मागेंच त्याला सागून ठेवल होत. आता त्याचं सागण पटत होत. पायातून एव्हानाच सारा जीव गेला होता. शेकोटी पेटविण्यासाठी हातमोजे काढावे लागले होते आणि मग हाताची बोटंहि बधिर झाली होती. ताशी चार मैलाच्या त्याच्या वाटचालीन रक्ताचा पुरवठा शरीराच्या पृष्ठभागाशी आणि आतील भागावर सतत खेळता राहिला होता. परतु मुशाफिराच पाऊल जरा अडल की, रक्ताचा पुरवठा तेवढा ओसरत होता पृथ्वीच्या त्या उघड्यावाघड्या शेंड्यावर अवकाशातला गारठा नुसता लोटालोटानी आदळत होता, आणि तिथ चालत असलेल्या मुशाफिराला त्या थडगार लोटाना एकाकी तोंड द्याव लागत होत. अगातल रक्त त्या लोटाच्या प्रत्येक तडाक्यान थिजत होत. कुत्र्याच्या रक्ताप्रमाणच त्या रक्तात हवेतल्या अदृष्टाची जाणीव पक्की मुरलेली होती. कुठ तरी लपून रहाव आणि थडीपासून आपादमस्तक स्वतःला वाचवाव अस तें रक्त मुशाफिराला सारख सुचवीत होत. ताशी चार मैल वेगान तो चालत होता तोवर रक्त सर्वभर खेळत होत, उसळत होत परतु आता तें ओसरत चालल, शरीराच्या खाचाखोचात लपू लागल. त्याचा अभाव शरीराच्या टोंकाना प्रथम

जाणवला. ओले पाय भराभर थिजू लागले. उघडीं बोट भराभर ताठू लागली. तरी बरं, तीं अद्याप थिजू लागलेली नव्हती. नाक, गाल केव्हाच बधिर पडले होते. अगभर मुंग्या येत होत्या. रक्त पोचत नव्हत.

परतु तो सुरक्षित होता. अगठे, नाक, गालफड फक्त तात्पुरतीच गारठली असती, कारण शेकोटी आता चागलीच पेटू लागली होती. बोटाएवढ्या जाड काटक्या तो आता तिच्यात सारू लागला होता. मिनिटभरातच मनगटाएवढ्या जाडीच्या फाद्या तिच्यात टाकता आल्या असत्या, आणि मग ओले बूटमोजे काढण शक्य होणार होत. उघडे पाय शेकोटीच्या उबेत खुशाल धरण जमणार होत. प्रथम अर्थात् ते बर्फाच्या चुऱ्यान चरचरा घासावे लागले असते. पहाता पहाता शेकोटी चागलीच धडाडली. आता ती विझणार नव्हती. त्याला भीति नव्हती. सल्फर क्रीकवरच्या त्या जुन्या रहिवाशाचा सल्ला त्याला आठवला आणि जिवणीवर हसू फुटल. ऊष्णतामान पन्नास अशा-पेक्षा खाली उतरल्यास या क्लॉनडाइक भागात कुणीहि एकट्यान प्रवास करता कामा नये, असा कडक दडकच त्या म्हाताऱ्यान घालून दिलेला होता. आणि मुशाफिर तर या हवेंत, असा, एकटा इथ होता. अपघात होऊनहि सुखरूप होता. त्याला आता वाटल कीं, ही काही काही जुनीं खोड वृत्तीन बायकीच. धाडस कस तें नाही. जिगर नाही. माणसान डोक ताळ्यावर ठेवल म्हणजे त्याला या हवेंत, इथ, कांहीसुद्धा भीति नव्हती. कसली भीति होती ? छातींत मर्दाचं काळीज वागवणारा कोणीहि या भागातून एकट्यान प्रवास करू शकत होता. हा विचार मनांत घोळत असता, आश्चर्यजनक झपाट्यान मुशाफिराचीं गालफड आणि नाक जास्त जास्त बधिर होऊं लागल. एवढ्यात बोट पार सुनी पडतील असदेखील त्याला वाटलं नव्हत. सुनी तर ती पडलीच होती, जळणाची काटकी उचलण्यासाठी घट्ट जुळूसुद्धा शकत नव्हतीं. शरीरापासून, स्वतः-पासून वेगळी आणि स्वतत्र वाटत होतीं. काटकी उचलतांना ती बोटात

नाट धरली आहे की नाहीं तें मुद्दाम न्याहाळून पहाव लागत होत. तो आणि त्याचीं बोटं यांच्यांतला संबध जणू तुटला होता.

हें सारं अर्थात् तस फारस महत्त्वाचं नव्हत. शेकोटी होती. तडतडत होती, जळत होती, ज्वाळेच्या एकेका उशीसरशी नवा दिलासा देत होती. मुशाफिरानं मोजे काढण्याला आरभ केला. त्यांवर बर्फाचा घट्ट थर बसला होता.घोट्यावरपर्यंत पोचलेल्या त्या मोज्याना लोखंडाच्या अवजड चिलखताचीच कळा आली होती.बुटाचे बद तारांसारखे ताठरले होते,चिवट झाले होते. काहीं अपघातानेंच जणू ते केव्हां तरी जागोजाग वांकले होते, त्यांच्या गाठी बसल्या होत्या, एवढंच. प्रथम मुशाफिरानं सुन्या बोटांनी बंद सोडविण्याचा विफल प्रयत्न केला आणि मग चूक उमगून त्यान खिशातला चाकू बाहेर काढला.

परंतु बंद कापण्याआंत तें घडल. गफलत त्याचीच होती. खर म्हणजे चूकच होती. स्प्रूसच्या झाडाखाली त्यान खरं तर शेकोटी पेटवायला नकोच होती. उघड्यावर पेटवायला हवी होती. झाडाखालच्या काटक्या उचलून थेट शेकोटींत टाकण त्याला सोप गेल होतं, एवढीच सोय. पण आता, वरच्या झाडावर साकळून राहिलेल बर्फ खालच्या धगीन वितळू लागल. वारा कैक दिवस नसल्यान फादी न् फादी बर्फानं गच्च भरली होती. काटक्या एकेक करून तोडताना, ओढताना झाडाला नाहीं म्हटल तरी थोडे धक्के बसलेच होते. ते तसे ओझरतेच होते, तरीहि घडलं तें त्या धक्क्यामुळेंच घडल. उचावरच्या एका फादीवरचं बर्फाच पुर ओझ खालीं खचलं. तें खालच्या फाद्यावर पडून त्या पिचल्या. त्याच बर्फ आणखी खालीं कोसळलं. असा प्रकार झाडाच्या साऱ्या विस्तारात भराभरा झाला. आणि सरतेशेवटी मुशाफिराच्या ध्यानीं मनीं नसता बर्फाचा तो सारा संभार त्याच्यावर आणि शेकोटीवर धडाधड कोसळला. शेकोटी बर्फाखालीं पार बुजून गेली. ती पेटत होती तिथं आता बर्फाचा ताजा, अस्ताव्यस्त थर तेवढा दिसू लागला. होत्याचं नव्हतं झाल.

मुशाफिराला धक्काच बसला. 'आपुलें मरण पाहिलें म्या डोळा' तशी क्षणभर त्याची अवस्था झाली. सुन्न बसून तो शेकोटी होती त्या जागेकडे सताड नजरेनें पहात राहिला. मग तो हळूहळू सावरला. सल्फर क्रीकवरच्या त्या अनुभवी माणसाच म्हणणं अगदींच खोटं नव्हत हेंच खरं घडल त्याचा अर्थ खर म्हणजे हाच आणि इतकाच होता. बरोबर जोडीदार असता तर धोक्याच कारणच उरल नसत. जोडीदारान शेकोटी पेटविली असती. आताच्या परिस्थितीत, मुशाफिराला ती पुन्हा नव्यानें पहिल्यापासून पेटवावी लागणार होती. आणि या दुसऱ्या खेपेला ती पेटवता न येऊन चालण्यासारख नव्हत. आणि ती पेटवता आली असती तरी तोंवर पायाची काही बोटं कामांतून जाणारच होती. एव्हानाच पायातली सवेदना ठार मेल्यासारखी होती आणि नवी शेकोटी पेटवायची तर त्याला काहींतरी अवधि लागणार होता.

मुशाफिराच्या मनातले हे विचार होते. पण हे त्यान एका जागीं स्वस्थ बसून केले नाहीत. ते मनातून सरकून जात असतानाच तो भराभरा नव्या शेकोटीच्या खटपटीत होता. शेकोटीसाठीं त्यानं आता नवी बैठक तयार केली. या वेळी जागा उघड्यावरची निवडली. एखाद्या दगलबाज झाडावरल्या बर्फान आता शेकोटी बुजण्याचा संभव नव्हता. पुन्हा त्यान काटक्या, सुक गवत आणि फाद्या जमा केल्या. बोटानीं यातल काही जोडण त्याला जमेना तेव्हा पज्यान धरून समूळ उपटल. यात मग कुजक, सडकहि बरचस हाती आल. निरुपयोगी, टाकाऊ. पण त्याला इलाज नव्हता. पद्धतशीरपणें त्यान अशा तऱ्हेन नवं जळण जमा केल. शेकोटी चागली धडाडल्यावर टाकण्यासाठी त्यात त्यान मोठ्यापैकीं काहीं फाद्याहि घेतल्या. हा सर्व वेळ कुत्रा एका जागी मुकाट बसून हें सार पहात होता. त्याच्या डोळ्यात एकच एक उत्कट अपेक्षा तरळत होती. त्याच्या दृष्टीन शेकोटीची त्याची मोठी गरज हा माणूस भागवणार होता. आणि त्याला तर फार वेळ लागत होता.

सर्व तयारी झाल्यावर बर्चच्या नव्या तुकड्यासाठी मुशाफिरान खिशात हात घातला तो खिशात होता हें त्याला ठाऊक होतं. आणि बोटाना तो जाणवला नाहीं तरी चाचपडताना तो खुसफुसला तें त्याला ऐकू आल. प्रयत्न करूनहि त्याला तो पकडता येत नव्हता. आणि एकीकडे सर्व वेळ हें समजत होत की क्षणाक्षणाला आपले पाय थडीन गोठताहेत. या विचारान खर म्हणजे भीतीची धडकी त्याच्या उरात भरायला बघत होती, ब्रह्माड आठवू पहात होत. पण मोठ्या शर्थीनं याविरुद्ध झगडत तो मन एकीकडे शात ठेवीत होता. दातानी त्यान हातातले मोजे ओढले, पजे पुढेंमागे ताणले, सगळी ताकद एकवटून दोन्ही हात फाड्फाड दोन कुशीवर आपटून घेतले. हें सार त्यान केल, बसून केल. आणि उभ्यान हेंच करण्यासाठी तो खडा झाला. कुत्रा मात्र बर्फात बसून होता. उबेसाठीं पुढल्या पायावर त्यान त्याची कोल्ह्यासारखी केसाळ शेपटी घट्ट वेढून घेतली होती. त्यान कान टवकारले होते. आणि नजर एकटक मुशाफिरावर लावली होती. हाताची कवाईत जोरजोरान करतानाच, देवान दिलेल्या केसाळ कातड्याच्या उबेत सुरक्षितपणें बसलेल्या त्या जनावराला पाहून मुशाफिराच्या मनात त्याच्याविषयीचा हेवा दाटला.

काहीं वेळ कवाईत केल्यावर लाब कुठ तरी बोटाच्या टोकाशी दणझुणती सवेदना जाणवू लागल्याचा इषारा मुशाफिराला मिळाला. ती अस्पष्ट सवेदना हळूहळू वाढू लागली आणि वाढता वाढता तिची चावरी, लचके काढणारी दुखरी वेदना झाली. ती वेदना असह्य वाटूं लागली. परतु मुशाफिराला मात्र ती हवीशी वाटली. उजव्या पज्यातला मोजा काढून बर्चचा तुकडा त्यानं खिशातून काढला. उघड्यावर येतांच हाताची बोट पुन्हा वेगान सुनी पडू लागली. लागलीच त्यान सल्फरच्या काड्याचा त्याच्याजवळचा जुडगा काढला. परतु तोवर कडाक्याच्या गारठ्यान बोटातला जीवच गेला होता. एकीपासून दुसरी काडी वेगळी काढण्याच्या प्रयत्नात मग सगळा जुडगा बर्फात पडला. बर्फातून तो वर

उचलण्याचा प्रयत्न त्यान केला, पण तो जमला नाहीं. सुन्या बोटाना पकडच उरली नव्हती. संवेदना उरली नव्हती. तरीहि न डगमगता त्यानं निग्रहानं गोठत्या पायाचा, नाकाचा, गालफडाचा विचार मनावेगळा केला. सार ध्यान काड्यावर एकवटल. स्पर्शाच्या संवेदनेऐवजी नजरेचा उपयोग करीत त्यान बोट त्या जुडग्याला लावली. ती दोन्ही बाजूना व्यवस्थित येताच त्यान ती मिटली. म्हणजे मिटण्याचा प्रयत्न केला. मुळात त्याच्यावर त्याच काही नियंत्रणच राहिल नव्हत आणि म्हणून बोट बिनमिटलेलीच राहिली. उजवा हात मग त्यान हातमोज्यात सरकवला आणि तो दात-ओठ खाऊन गुडघ्यावर फाडफाड आपटला. मग हातमोजे घातलेल्या दोन्ही पंज्यानी त्यान काड्याचा जुडगा बर्फाच्या बऱ्याच टवक्यानिशी उचलला आणि मांडीवर घेतला. तरीहि त्याची एकूण परिस्थिति अजून सुधारलेली नव्हती.

काही वेळ प्रयत्न केल्यावर दोन्ही पंज्याच्या जुडींत त्यान तो जुडगा धरला. तसाच उचलून तोंडापर्यंत आणला. जोराचा प्रयत्न करून त्यान तोंड उघडताच, वरच बर्फाच घट्ट पलिस्तर तडतडल आणि तडकून फुटल. मग त्यान खालचा जबडा मागे धरला. वरचा ओंठ उचलला आणि जुडग्यातली काडी वेगळी काढण्यासाठी तो दातानी तो जुडगा ओरबाडू लागला. एक काडी वेगळी काढण त्याला जमल तशी ती त्यान मांडीवर टाकली. अद्याप त्याची परिस्थिति कायम होती. ती काडी त्याला उचलता येत नव्हती. मग त्यान एक उपाय काढला. ती काडी त्यान दातात धरली आणि पायावर ती तो घासू लागला वीसएक वेळा त्यान ती तशी घासली तेव्हा ती पेटली. ती पेटली तशी दातानीच त्यान ती बर्चच्या तुकड्यावर धरली. पण तेव-ढ्यात तिच्या धुराचा भपकारा नाकपुड्यावाटे त्याच्या छातीत गेला आणि त्यान घुसमटून तो जोरजोरानें खोकू लागला. काडी बर्फात पडली. विझून गारीगार झाली.

सल्फर क्रीकवरचा तो म्हातारा रहिवासी ठीकच बोलला होता,

नतरच्या, प्रयासानी काबूत ठेवलेल्या उद्विग्नतेत, मुशाफिराला असं वाटल. काय बोलला होता तो? "शून्याखाली पन्नास अंश इवेंत माणसानं जोडीदार घेऊनच या भागात फिरलं पाहिजे." मुशाफिरानं आता हात अंगावर आपटले, पण त्यात जीव आलाच नाही. मग एकदम त्यानं दातानीं हातमोजे ओढून दोन्ही पजे उघडे केले. पज्याच्या उचवट्यांत सबंध जुडगा पकडला. हाताचे स्नायू अद्याप गारठले नव्हते हें एकापरीं बर होत. त्यामुळंच पज्याच्या उचवट्यात जुडगा त्याला घट्ट पकडता आला. मग त्यान तो जुडगाच्या जुडगा आपल्या पायावर पुन्हा पुन्हा घासला. काड्या पेटल्या. एका वेळी सत्तर आगकाड्या! त्या विझण्याला त्या वेळीं वारा नव्हता. उठलेल्या धुराच्या लोटापासून त्यान तोंड आधीच लाब एका बाजूला धरलं होत. बर्चच्या तुकड्याशी त्यानं त्या पेटत्या काड्या धरल्या. तशा त्या धरल्या असताना त्याच्या हातात कसली तरी सवेदना त्याला जाणवू लागली. चटके बसू लागले. हाताची कातडी जळू लागली. जळका वास सुटला. नाकपुड्यात शिरला. खोलपर्यंत पोचला. हाताच्या सवेदनेला वेदनेच स्वरूप आल. वेदना वाढत सुटली. आणि तरीहि तो ती सहन करीतच राहिला. बर्चच्या तुकड्यावर त्या पेटत्या काड्या कशाबशा धरूनच राहिला. पण तो तुकडा लौकर पेटेना. कारण मुशाफिराचे पोळते पजेच मध्यें येत होते. सगळी ज्वाळा त्या पज्यावरच येत होती.

शेवटी,अगदीं असह्यच झाल्यावर, त्यान हात झटक्यान अलग केले. जळत्या काड्या बर्फात पडल्या. पण बर्चचा तुकडा पेटला होता. तो जळत राहिला. त्याच्या ज्वाळेवर सुक गवत, लहानात लहान काटक्या टाकण्याला त्यानं सुरुवात केली. निवडून घेण जमत नव्हत. पंज्याच्या उचवट्यातच सारं काही धरून कष्टान उचलावं लागत होत.काटक्याना कुजक्या लाकडांचे तुटकेफुटके तुकडे आणि ओल गवत अडकलं होतं. दांतांनी जमेल तस हें सारं तो पकडून वेगळ काढीत होता. तशा अवघडल्या अवस्थेंतहि अत्यंत काळजीनं बर्चची ज्योत तो फुलवीत होता,चेतवीत होता. ही ज्योत

म्हणजेच तूर्त जगण्याची एकमात्र हमी होती,हेंच प्रत्यक्ष जीवन होत.हे विझून चालणार नव्हत. मुळीच चालणार नव्हत. शरीराच्या पृष्ठभागाशी साकळ-लेल रक्त ओसरल्यान आता नवी हुडहुडी भरू लागली होती. तो आण-खीच अवघडून गेला. ओल्या गवताचा एक मोठाच पुजका त्या छोट्याशा शेकोटीवर पडला. बोटानी ढोंसून त्यान तो बाहेर काढण्याचा प्रयत्न केला, पण हुडहुडत्या अगामुळ ढोंसण जरूर त्यापेक्षा जास्त झाल ती छोटी शेकोटीच विस्कटली जळत गवत आणि छोट्या काटक्या चौफेर पसरल्या. त्यान पुन्हा त्या ढोसून एकत्र करण्याचा प्रयत्न केला, सगळ चित्त एकवटून केला एकाग्रतेनें केला, जीव लावून केला. पण हुडहुडी हात एका जागी ठरूच देत नव्हती बोटावर मुळीच ताबा उरला नव्हता शेकोटी पुन्हा पेटती ठेवण्याच्या त्या प्रयत्नान ती जास्त विस्क-टली मात्र. काटक्या अगदीच लाब लाब विखुरल्या धुराचा एकेक सुस्कारा सोडून एकेक काटकी विझून गेली. बर्चचा तुकडादेखील ठार-विझला होता.

आता तीव्र विषादाने मुशाफिरान भोवताली पाहिल. त्याची नजर कुत्र्यावर गेली. विझल्या शेकोटीपलीकडे, बर्फात, तें मुक जनावर, चुळ-बुळत,चळवळत कसबस बसलं होत.अंगाची जास्त जास्त जुडी करून घेऊ बघत होत. पुढले पाय आळीपाळीन उचलीत होत, अगाच ओझ या पायावरून त्या पायावर पालटत होत. आशाळभूतपणें शेकोटीकडे आणि मुशाफिराकडे टकमक पहात होत.

कुत्र्याकडे पहाताना मुशाफिराच्या मनात एक विलक्षण कल्पना चमकली. बर्फाच्या वादळात सापडलेल्या एका वाटसराची गोष्ट त्याला आठवली. त्या वाटसरान बैल कापून त्याच्या मुडद्यात शिरून बसून त्या तुफानापासून स्वतःचा जीव वाचवला होता. त्याला वाटलं कीं कुत्र्याला ठार कराव, आणि त्याच्या ऊबदार शरीरात हात लपवावेत—बधीरपणा जाईपर्यंत. मग नवी शेकोटी पेटवता आली असती. जीव बचावला असता. त्यान कुत्र्याला चुचकारल, जवळ बोलावलं. पण त्या

आवाजातल्या अनामिक भीतीच्या सूचनेनं तें मुकं जनावर कचरलं, घाबरलं. हा माणूस त्याच्याशी अशा सुरांत मागं कधीच बोलला नव्हता. काहीतरी वेगळं घडलं होतं. आणि त्या जनावराला त्यांत धोका जाणवला—कोणता, काय, तें त्याला माहीत नव्हतं, पण समोरच्या माणसाविषयी पक्का संशय त्याच्या मेंदूत रुजला एवढं निश्चित. मुशाफिराच्या आवाजासरशी त्यानं कान पाडले, पुढल्या पायांची आणि एकूण अंगाची चाळवाचाळव तें जास्तच करूं लागलं अंगाची जुडी जास्त जास्त करूं लागलं. काहीं केल्या मुशाफिराजवळ तें येईना. मग तोच दोन्ही हात जमिनीवर टेकून त्याच्या दिशेनें सरकूं लागला. त्याच्या या आगळ्या चालण्यानें तें जनावर जास्तच संशयग्रस्त झालं आणि जवळ येण्याऐवजी जास्त जास्त दूर सरकूं लागलं.

क्षणभर मुशाफिर बर्फांत स्थिरावून स्वतःला शर्थीनं शांत ठेवूं लागला. मग त्यानं दातांनी हातमोजे हातांत सरकवले आणि तो उठून पायावर उभा राहिला. मग प्रथम त्यानं खालीं पाहून आपण खरंच उभे राहिलों आहोंत याबद्दल स्वतःची खात्री करून घेतली. कारण पाय सुन्ने पडल्यानं भुईशीं कांही संबंधच जाणवत नव्हता. तो ताठ उभा राहिला एवढ्यानंच कुत्र्याच्या मनांतली संशयाची जळमटं पहातां पहातां दूर झाली. आणि मुशाफिरानं तोंडानं चुचकारता आवाज काढून त्याला जवळ बोलावतांच तें जुन्या खुषीनें त्याच्यापाशीं आलं. तें झेंपेंत येतांच मुशाफिराचा स्वतःवरचा ताबा सुटला. त्याचा हात झटक्यानं कुत्र्याच्या दिशेनं पुढं सरकला, पण त्या हातानं कांहीं पकडतां येत नाहीं हें त्याला कळलं तेव्हां त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. बोटं वाकत नव्हतीं आणि त्यांच्यातला जीव मेला होता क्षणापुरता, आपलीं बोटं थिजलीं आहेत आणि तीं जास्त जास्त थिजताहेत हेंच मुळीं तो विसरला होता. आतां त्याची अशी जाणीव होतांच, तें जनावर लांब जाण्याआंत मुशाफिरानं बाहूंनी त्याच्याभोंवतीं घट्ट घट्ट कैंची घातली. तो बर्फांत बसला. तसं बसून त्यानें कुत्र्याला घट्ट धरून ठेवलं.

तो मुका प्राणी यान कुचबून, सुटण्यासाठी शर्थीनं धडपडूं लागला, गुरगुरूं लागला, भुंकू लागला.

त्याला तसा मिठीत धरून बर्फात बसणंच काय तें मुशाफिराला जमत होत. कुत्र्याला आपण मारू शकणार नाही हें त्याला समजल होत. तसं करण्याचा एखादा मार्ग तूर्त तरी नव्हता. सुन्या पज्यामध्यें चाकू धरण शक्य नव्हतं आणि गळा दाबून मारणहि अशक्य होत. त्यान कुत्र्याला सोडल. जिवाच्या करारानें आणि शेपटी घालून गुरगुरत तें जनावर सुसाट लाब पळाल. सुमारें चाळीस कदमावर जाऊन तें थांबल. मुशाफिराला त्यान स्तिमित आणि मूढ नजरेन न्याहाळल. कान ताठ उभारून न्याहाळल. हात शोधण्यासाठी मुशाफिरानं हाताच्या दिशेन बघितल; आणि त्याला ते खाद्याना लोबत असलेले दिसले. आपले हात कुठ आहेत हें माणसाला डोळ्यानीं शोधाव लागाव याच मुशाफिराला गूढ वाटल. पुन्हा एकदा त्यान हाताची कवाईत नव्या जोरान सुरू केली. हातमोजे घातलेले पजे दोन्ही कुशीवर थडाथड आपटून घ्यायला सुरुवात केली. सुमारें पाच मिनिट हे असं त्यान जोरजोरान केल. हुडहुडी थाबण्याइतक रक्त यान त्याच्या शरीराच्या पृष्ठभागाशी खेळू लागल. पण हाताना मात्र सवेदना आलीच नाही. ते तराजूच्या पारड्यासारखे दोन बाजूना दोन लोबत होते, एवढच. ही जाणीव खाली हातापर्यंत पोचवण्याचा शिकस्तीचा प्रयत्न मुशाफिरान केला, पण ती जाणीवच हरपली

त्याच्या मनात आता मरणाबद्दल, भीतीनं भरलेली एक निश्चिती वाढू लागली. बोथट, आणि सार अस्तित्व झपाटू बघणारी ही भीति होती. या भीतीला बघता बघता अगदी दीनवाण स्वरूप आल. सभव केवळ बोट गोठण्याचाच नव्हता, किंवा हातपाय निकामी होण्याचादेखील नव्हता. आता सवाल होता तो जास्त महत्त्वाचा.अगदी मूलभूतच. जगणार कीं मरणार, हा. आणि यात परिस्थिति मुशाफिराविरुद्ध दंड थोपटून उभी होती यानं त्याचा जीव बघतां बघता गोळा झाला. आणि तसाच वळून

जुन्या, अस्पष्ट पायवाटेनं तो सुसाट धावत सुटला. कुत्रा मागून धावला. कुत्रा बरोबरीनं धावला. आयुष्यात असली भीति मुशाफिरानं कधी पाहिली नव्हती, कधी सोसली नव्हती. एवढा तो कधी धसकला नव्हता. पोटात एवढा, आभाळाएवढा मोठा खड्डा कधी पडला नव्हता. वाट फुटली तिकडे तो धावला. भीतीन आधळा, बहिरा होऊन धावला. वेड्यासारखा धावला. मग, बर्फातून पाय ओढताना, पुढें टाकताना हळू हळू त्याचा विचार पुन्हा जागला. शुद्ध आली. भोंवतालचा टापू त्यानें नजरेत घेतला. पान झडून गेलेली ॲस्पेन्सची झाड, आभाळ, जमीन. धावण्यान जरा बर वाटल होत. आता तो हुडहुडत तरी नव्हता. कदाचित्, तो तसाच पळत राहता तर पायाना आलेला बधिरपणादेखील गेला असता. आणि निदानपक्षीं तळावर आपल्या माणसात तर नक्कीच पोचता आल असत. काहीं बोट–हातापायाची–निकामी होणार हें निश्चितच होतं, चेहऱ्याचा काही भागहि कामातून जाण्याची शक्यता होती. पण तळावर त्याच्या माणसानीं त्याची काळजी घेतली असती, त्याच्यावर उपचार केले असते. त्याच जें काहीं उरल असत तें तरी सुरक्षित ठेवण्यासाठी कष्ट घेतले असते. याच वेळीं, या विचाराबरोबरच दुसराही एक विचार त्याच्या मनात सावकाश बळावत होता. तो हा कीं, आपण कधीच आता तळावर पोंचणार नाहीं. अतर मैलोगणती होत. अगाचे भाग तर एव्हानाच काही सुने पडले होते, काही सुने पडत होते. थोड्याच वेळात तो काकडून, गोठून मरणार होता. होय, लाकडासारखा ताठ होऊन मरणार होता. अगदी ठार मरणार होता, सपणार होता. हा विचार शिकस्तीन त्यान मनाच्या मागल्या बाजूला सारला आणि त्याबद्दल विचार करण्याचच नाकारल. काही वेळा तो विचार मुसंडीनं पुढें आला, 'माझ काय' म्हणून विचारू लागला. तितक्या वेळा मुशाफिरान तो मागें रेटला. दुसऱ्याच कशाचा तरी विचार करण्याचा शर्थीचा बहाणा तो करीत होता.

जमिनीवर आपटले तर आपटल्याचं कळलं नाहीं अशा गोठल्या

पायानीं आपण पळूं शकलो याच त्याला भारी नवल वाटल. आपण हवेंत तरंगत असल्याचाच भास त्याच्या मनात तरगत होता. भुईशीं काही सबध नव्हता, नात नव्हत. केव्हा तरी त्यान एकदा एक मर्क्युरी पक्षी बघितला होता. आता त्याला वाटलं की उच अंतराळात तरंगताना त्या मर्क्युरी पक्ष्याला आपल्यासारखच वाटत असेल का ?

तळावर पोचेतोवर धावण्याच्या त्याच्या बेतात एकच उणीव होती. तेवढ धावण्याइतक बळ, तितकी सहनशक्ति त्याच्यापाशीं राहिली नव्हती. बरेचदा तो ठेंचाळला, आणि मग कोलमडला, भुईवर लोळला. उठण्याचा प्रयत्न त्यान केला तो जमला नाही. बसून दम टाकायला हवा अस त्यानं ठरवलं. नतर धावायचच नाही, फक्त चालून वाट कापीत रहायच असही त्यानं ठरवल. बसल्या बसल्या धाप थाबली तशी त्याला उमगल की आता आपल्याला अगदी उबदार आणि आरामशीरदेखील वाटत आहे. हुडहुडी नव्हती. छातींत, माड्यात, एक नवीच ऊब जाणवत होती. आणि तरी, नाकाला, गालफडाना त्यानं स्पर्श केला, त्यात अजून कोणतीच सवेदना जाणवत नव्हती. पळण्यामुळें त्याच्यात बिलकुल धुगधुगी आली नव्हती. हातापायातदेखील आली नव्हती. मग त्याला वाटल की अगाचे गोठलेले भाग एकसारखे वाढत असावेत, लाबत असावेत. हें विसरण्यासाठीं त्यान हा विचार दडपून टाकला, दुसरं काहीतरी वाटून घेण्याचा प्रयत्न केला. पण हा विचार दडपला जात नव्हता. उलट त्यान भीतीची भावना एकसारखी वाढत होती. या वाढत्या भावनेचीदेखील त्याला आता मनस्वी भीति वाटली. पण तो विचार जाम पाय रोवून उभा होता, हट्टीपणानं उभा होता. ढळायला तयार नव्हता. पाडाव व्हायला, दडपला जायला तयार नव्हता. होता होता त्यातून सपूर्ण गोठलेल्या शरीराच एक भयकर चित्र मुशाफिराच्या मन:चक्षूसमोर उभ राहिलं. बाप रे ! त्याला ब्रह्मांड आठवल. जीव घेऊन तो पुन्हा एकदा पायवाटेनं धावू लागला. मध्येंच धांव मंद करून तो चालू लागला. परंतु सपूर्ण अंग गोठण्याच्या त्या कल्पनेनं त्याला चालू दिलं नाहीं. तो पुन्हा जीव एकवटून धावूं लागला.

येथवर सारा वेळ तें कुत्र त्याच्या मागोमाग पळत होत. दुसऱ्यांदा तो कोलमडून पडला तेव्हा तें त्याच्या पुढ्यात, पुढल्या पायांभोवती शेपटी लपेटून बसल, विलक्षण उत्सुकतेन, मन लावून त्याला न्याहाळू लागलं. त्या प्राण्याला असलेली ऊब आणि सुरक्षितता जाणवून मुशाफिर तडकला. तें जनावर कान साफ पाडून भुईवर सपाट होईतोंवर त्याला त्यानं शिव्या घातल्या. या खेपेला हुडहुडी लौकर भरली. गारठ्याशीं त्याची चाललेली झुज निकाली ठरणार आणि तिच्यात तोच हरणार अस आता दिसू लागल. सर्व बाजूनीं गारठा त्याच्या अगावरून सरपटत वर वर सरकत होता. त्या जाणीवेन तो कसाबसा पुढें पुढें धावत राहिला. पण फार तर शेंशंभर कदम तो धांवला असेल, नसेल. तोच तो ठेंचाळला, आणि तोडघशीं पडला. हा भयाचा कळस होता. पुन्हा दम आला, स्वतःवर ताबा आला, तेव्हा तो उठून बसला. त्यानं स्वस्थपणें विचार केला, मरण यायचंच तर तें निदान मानाचं येऊं दे. अर्थात् या शब्दात हा विचार त्याच्या मनात आला नाहीं. आपण मुंडी मुरगळलेल्या एखाद्या कोंबडीच्या पिलासारखे सैरावैरा धावतो आहोत, वेड्याखुळ्यासारखे पळतों आहोत असं त्याला जाणवल. हीच उपमा त्याच्या मनात आली. आणि त्याला वाटल की, आता सगळ अग गोठल्यावाचून चुकत नाहीं, तर मग स्वस्थपणान तें गोठू तरी द्याव काय होतं ते माणसाच्या लायकीन होऊं द्याव. नव्यान आलेल्या या मनःशातीन सुस्तीची पहिली लाट लाब आणि आत कुठें तरी अस्पष्ट फेसाळली. अगभर तिचे तुषार उडाले—सुस्तीचे तुषार. गाढ आणि तुस्त झोंपून मरणाला सामोर जाव ही कल्पना त्याला चागली वाटली. गुंगीचं औषध घेऊन झोपाव तसं सार घडणार होत. लोक उगीच बेटे म्हणत आले, गोठणं वाईट. काय वाईट होत गोठण्यात? कसला त्रास होता, कसले हाल होते— याहून अनेक यातनामय, दुखरीं मरणं होती.

त्याच्या मनःचक्षूपुढें दृश्य तरळूं लागलं उद्या आपली माणस मार्ग काढीत येतील. त्याना आपल प्रेत सांपडेल. पहाता पहातां तो

स्वतःच त्या माणसाच्यात सामील झाला, त्या जागी पायवाटेनं माग काढीत येऊन पोचला. वाटेच्या एका वाकणावरून पुढें आला आणि त्याला तो दिसला. बर्फात पडलेला त्याचा निष्प्राण देह. कसा बसल्या बसल्या गाढ झोपल्यासारखा दिसत होता. इतराबरोबर उभा राहून, बर्फात पडलेल्या त्या स्वतःच्या देहाकडे तो अचब्यानें,तिऱ्हाईतपणें पहात होता.गारठा आहे खरा बराच. त्याच्या मनात विचार तरळला. परत गावीं जाऊ तेव्हा सर्वांना सागू गारठा केवढा होता तें. ते नवल करतील. त्याना बेट्याना कल्पनाहि करता येणार नाही किती गारठा त्याची ! हें दृश्य पहाता पहाताच तो सल्फर क्रीकच्या त्या जुन्या रहिवाशापाशीं पोचला. त्याला तो म्हातारा स्वच्छ आणि अगदी ठसठशीत दिसला. शेकोटीशी अंग ताणून हातपाय शेकत आरामात बसला होता. पाइप ओढत.

"बॉस, तू म्हणालास तेच खर ठरल . तेंच खर ठरल.. " मुशा-फिर त्या अनुभवी माणसाला उद्देशून पुटपुटला.

आणि मग बघता बघता गात्रागात्रात गुगी दाटली. अशी झोप कधी मुशाफिराला आली नव्हती अशी आरामशीर, अशी तुस्त, अशी गाढ. कुत्रा त्याच्या पुढ्यात बसला. वाट पाहू लागला. दीर्घ, मद सूर्या-स्तानें दिवसाची भैरवी आळवण्याला आरभ केला. काळोख दाटू लागला. शेकोटी पेटण्याची काहीच चिन्ह कुत्र्याला दिसत नव्हती अस, शेकोटी न पेटवता बर्फात स्वस्थ बसून रहाण त्याला समजूच शकत नव्हत. अस कुणा माणसान केल्याच त्यान कधी बघितल नव्हतं. दिवस मावळला तसा गारठा आणखी वाढला. शेकोटीसाठी कुत्र जास्त आसुसल. न रहावून, शर्थीनं पुढले पाय उचलून तें हलकेंच एकदा भेंकल आणि यावर हा माणूस झोपमोड झाल्यान आपल्याला नक्की शिक्षा करणार अस वाटून त्यान कान पाडले आणि तें वाट पाहू लागल. पण त्याच्या समोरचा तो माणूस जागा झाला नाहीं, त्यान डोळे उघडले नाहींत. तो थोडासा चाळवलादेखील नाहीं. तो गप्गार राहिला. आता

कुत्रं चांगलं गळा काढून भेंकलं. तरीहि समोरच्या माणसाची कांहींच हालचाल नाही असं बघितलं, तेव्हां मात्र त्या मुक्या जनावरान त्याच्याशीं लगट केली, आणि त्याला मरणाचा वास लागला. ताड्दिशी शहारल्या अंगानं तें मागं हटल. आता वर अफाट आभाळात चादण्या सैराट नाचत होत्या, झगमगत होत्या. त्यांच्याकडे तोंड करून कुत्र काहीं वेळ स्वतःभोंवतीं गोल फिरत, गळा काढून, जिवाच्या आकातान भेंकलं. मग तें वळल आणि सरावाच्या पायवाटेनें चालू लागल. तळाकडे. तिथं आणखी कुणी तरी त्याला खाऊ घातल असतं, शेकोटीची ऊब दिली असती.

* * *

# जॉन स्टाइनबेक

अमेरिकेंतले विख्यात कादबरीकार आणि कथालेखक. १९०२ साली कॅलिफोर्नियात सालिनास इथें जन्मले. वडील जॉन अर्नेस्ट स्टाइनबेक स्थानिक पचायतीचे खजिनदार होते आणि आई शिक्षिका होती. सालिनासला शालेय शिक्षण संपूर्ण झाल्यावर स्टॅनफर्ड विश्वविद्यालयात दाखल झाले ते शास्त्राचे विद्यार्थी म्हणून. लेखनाचा पेशा पत्करण्याआधी अनेक रोजगार आणि भुरटे व्यवसाय केले. खऱ्या अर्थानें चतुरस्त्र लेखक. इतिहासकालीन 'रोमॅंटिक' कथानक असो, की अगदी आजच्या घटकेचा एखादा मनोविश्लेषणात्मक आणि नीतिबाह्य विषय असो, त्याची लेखणी सारख्याच तेजाने चालते. 'टॉर्टिला फ्लॅट' ( १९३५ ) 'दि लॉंग व्हॅली' ( १९३८ ) 'ग्रेप्स ऑफ राथ' (१९४०), 'ऑफ माइस ॲंड मेन' इत्यादि श्रेष्ठ कादबऱ्या याच्याच. त्यापैकीं कित्येक काद-बऱ्यावर नाटकें आणि चित्रपट झाले आहेत. 'ग्रेप्स ऑफ राथ'बद्दल त्याना १९४० साली अमेरिकेंतला पलिट्झर पारि-तोषिकाचा बहुमान मिळाला. युद्धकाळात युद्धआघाडीवर वृत्तपत्रवार्ताहर म्हणून गेले होते. त्यानंतरहि लेखन अप्रतिहत-पणें चालूच आहे. प्रस्तुतच्या 'दि क्रायसॅंथेमम्स' कथेंत आलेली काहीशी भावविवशता एरवीं त्याच्या लेखनात दुर्मिळ म्हटली पाहिजे. ही कथा अमेरिकेंत मात्र फार लोकप्रिय आहे— जशी आपल्या य. गो. जोश्याची 'शेवग्याच्या शेंगा' आपल्याकडे.

# आ ला स पा हु णा

हिंवाळ्यातल्या उंचच उंच धुरकट, दुलदुलीत धुक्यानं सालिनास खोरं आभाळापासून आणि बाकी साऱ्या जगापासून पार अलग केलं, बंद करून टाकलं. डोंगरावर चोहोंबाजूंनीं त्याचा दाट थर एखाद्या झाकणासारखा बसून राहिला आणि त्यानं तें खोरं एखाद्या बंद बरणी-सारखं होऊन गेलं. खालच्या विस्तीर्ण सपाट टापूवर नांगरानी खोलच्या खोल भुई उखणून फाळ घुसले होते, तिथं काळ्या मातीचीं ढेकळं मागं ठेवली होती. हीं ढेकळं धातूची ओतल्यासारखी चकचकीत दिसत होतीं. सालिनास नदीच्या दुतर्फा पसरलेल्या वाड्यांवरच्या, पिवळ्या बुडख्यांनीं भरलेल्या शिवारावर फिक्या सूर्यप्रकाशाचं सोनेरी पाणी शिंपडल्यासारखं उगीच वाटत होतं. हा तर डिसेंबर होता, खोऱ्यांत शपथेला उन्हाची तिरीप-

देखील नव्हती. नदीकाठच्या भागांतल्या झाडोऱ्यालाच पिवळीधम्मक पान लहडलीं होतीं आणि तींच उन्हाचा चावट भास निर्माण करीत होती.

सगळ कसं गप्‌गार आणि निवात होत. काहीतरी होईल म्हणून उगा वाट बघत असावस वाटत होत. हवेंत रेशमी गारठा होता. वायव्येकडन हलका वारा वहात होता. लौकरच पाऊस येणार अशी आशा धरण्याला शेतकऱ्याला एवढ पुरे होत. त्यावर जीव टांगला होता त्यान. पण धुक अन् पाऊस—छत्तिसाचा आकडा. म्हणजे पावसाचा भरोसा तितकाच, असा याचा अर्थ होता.

नदीपार, हेन्री ॲलनच्या डोंगरपायथ्यावरच्या वाडीवर काम जवळजवळ सगळी उरकलींच होती. गवताची कापणी झाली होती, त्याच्या गजीसुद्धा रचून तयार होत्या. आर्चर्डस्‌च्या राया नागरून ठेवलेल्या होत्या. धारा आल्या कीं आसुसून त्या पिऊन घ्यायला त्याची हजार तोंडं आता उघडलेलीं होती. वरच्या अंगाच्या वाड्यावरल्या गुराच्या कातड्याला भेगा जात होत्या आणि लव झडून भादरल्या कुलुंगी कुत्र्यागत तीं दिसत होतीं.

एलिसा ॲलनन, बागेंत काम करताकरता वाडीवर जरा लांब नजर टाकली आणि तिचा नवरा हेन्री कुणा दोघा माणसाबरोबर बोल-तांना तिच्या नजरेला पडला. ते दोघे रीतसर सुटाबुटात होते. ट्रॅक्टरच्या शेडपाशीं तिघे मिळून उभे होते. प्रत्येकानं एकेक पाय लगतच्या चिटुकल्या मोटारगाडीवर रोवला होता. सगळे सिगरेटी ओढीत होते आणि बोलता-बोलता एकीकडे त्या छोट्या मोटारीच निरीक्षण करीत होते.

अगदीं एक मिनिटभरच एलिसान त्याना तस पाहिल आणि ती पुन्हा आपल्या कामात गुतली. तिच वय पास्तिशीच होत. तिचा चेहरा लांबट आणि करारी होता अन् डोळ्यात कसल तरी आगळ पाणी खेळत होत. बागेंत काम करण्याच्या वेळी ती करी तसाच पोषाख तिनं आतां केला होता. आणि त्यात ती उगीचच ढोबळ ढोबळ, आडवी दिसत होती. बाप्ये

लोक घालायचे त्यातलीच एक पुरुषी हॅट तिन डोळ्यापर्यंत ओढली होती. तिच्या पायात दणकट बूट होते. अगात रंगीबेरंगी डिझाइन्सचा झगा होता, पण तो एका मोठ्या भरभरीत 'अॅप्रन'खाली जवळ जवळ पुरा झाकला होता. अॅप्रनला काहीबाही ठेवायला चार मोठे खिसे होते. त्यात म्हटल तर बियाण राहू शकत होत, म्हटला तर विळा राहूं शकत होता, आणि खुरपदिखील राहिल असत. काम करताना हाताची खराबी होऊं नये म्हणून एलिसान चामड्याचे हातमोजे हातात घातले होते.

आदल्या वर्षीच्या 'क्रायसॅथेमम' फुलझाडाचे देंठ ती आखूड पात्याच्या मोठाल्या कैचीन भराभरा छाटीत होती. मधूनच ट्रॅक्टर-लगतच्या त्या माणसाकडे तिच लक्ष वळत होत. तिच्या मुद्रेवर चौकस-पणा होता, पोक्तपणा होता, आणि रेखीवपणादिखील बराच होता. ती कैची चालवीत होती तीदिखील एका घाईन, दणकटपणे. तिच्या त्या सपाट्यापुढ 'क्रायसॅथेमम'चे ते कोवळे देंठ अगदीच दुबळे खन् क्षुद्र वाटत होते.

हातमोज्याच्या पाठच्या भागान मध्येंच तिन, डोळ्यावर आलेला केंसाचा झुबका माग सारला आणि नकळत हातमोज्याची माती थोडी गालाला चिकटून राहिली. मागल्या बाजूला तिच नीटनेटक पाढरशुभ्र घर उभ होत. त्याच्या खिडक्यापर्यंत चहूबाजूंनीं लाल जिरॅनियम्स फुललीं होतीं. घर छोटसं आणि टुमदार होत. नुक्तंच घासूनपुसून लख्ख केल्या-सारखी त्याला उजळ कळा होती. त्याच्या खिडक्यादिखील चकचकीत होत्या. आणि पुढल्या पायऱ्यावर स्वच्छ पायपोस अथरलेला होता.

ट्रॅक्टर—शेडच्या दिशेन एलिसान पुन्हा एकदा पाहिल. ते अनोळखी दोघेजण पलीकडे उभ्या असलेल्या त्याच्या मोटारीत चढत होते. एलि-सान एक हातमोजा काढला आणि तिचीं लाबसडक भरीव बोट क्राय-सॅथेमम्सच्या नव्या कोवळ्या रोपट्याच्या दाटीत खुपसलीं. जुन्या रोप-ट्याच्या मुळाशी हीं नवीं रोपटीं फुटलीं होती. तिनं पानं बाजूला सारली

आणि त्या नव्या रोपट्यांचे दैंठ न्याहाळले. तिथं कीड, मुगी कांहीं नव्हती. एलिसाच्या 'शिकारी' बोटानी असली कीड लागण्याआधींच खुडली, चिरडली जाई.

नवऱ्याच्या आवाजान दचकून आता एलिसान माग पाहिलं. चाहूल न देता तो तिच्याजवळ आला होता. गुरंढोर, कुत्री, कोबडी बागेत घुसू नयेत म्हणून घातलेल्या कुपणावर तो रेलला होता.

"कामाला अगदी ऐकतच नाहींस बघ तू. नवीन पुष्कळ रोप येणारस दिसतय."

एलिसान रग लागलेल्या पाठीला एकदा तणावा देत, काढलेला हातमोजा पुन्हा हातात सारला. ती म्हणाली, "हो. येत्या वर्षाला चागलीं जीव धरतील हीं." तिच्या आवाजात, मुद्रेवर माफक संतोष होता

हेन्रीनं कौतुकान म्हटल, "तुझा हातगुणच चागला. यंदाच्या तुझ्या पिवळ्या क्रायसॅंथेमम्सची काही काही फुल तर चागली दहा इंच आसाची होती. आता अस कर ना, आपल्या आर्चर्डकडे लक्ष दे दहा इंच आंसाची सफरचंद येऊं देत!"

एलिसाची नजर बारीक झाली. ती म्हणाली, "मनात आणल तर तेसुद्धा जमेल. हातगुण आहेच चागला. माझ्या आईचा पण होता. तिन काहीं लावलं आणि ते रुजून आल नाहीं, वाढल नाहीं,अस व्हायच नाही. ती म्हणायची, माळणीचे हात आहेत माझे. झाड लावायला कुणी शिकवल नाही मला. बाग करायला शिकवल नाहीं. तें मूळचच आहे."

हेन्री म्हणाला, "फुलझाडाच्या बाबतींत तरी तुझं आहे खर तस."

"तुम्ही आता बोलत होतात ते कोण होते दोघे?"

"कोण? हा हा! अग तेंच तर तुला सागायला आलो नव्हे का मी! वेस्टर्न मीट कंपनीची माणस होतीं ती. तीन वर्षांचे आपले ते

तीस खोड आहेत ना, ते विकले आत्ताच मी त्याना. जवळपास मनात धरलेलाच भाव मिळाला बघ."

"चला. बर झाल!" एलिसा उद्गारली, "तुमच्या मनासारखं झाल."

"हो सौदा पटला नि मनात आल," हेन्री म्हणाला, "मनात आल कीं आज आहे शनिवार. तेव्हा सालिनासला जाऊन एखाद्या हॉटेलात जेवाव, मग पिक्चरला जाव थोडी चैन करावी, कस?"

"खरच, चागली आहे कल्पना!" एलिसा म्हणाली, "खरच चागली आहे."

हेन्रीन आपल्या टेवणीतल्या खास गमत्या सुरांत म्हटल, "आज बॉक्सिंगच्या लढती पण आहेत त्याना जाऊ या का ग आपण?"

"नको!" एलिसा जोरान उद्गारली, "नको. मला नाही आवडत त्या तुमच्या लढती"

"अग, गमत केली मी तुझी आपण सिनेमालाच जाऊ. बघ ह. आता वाजलेत दोन स्कॉटीला घेऊन टेकडीवर जाऊन मी ते तीस खोड घेऊन येईन म्हणतो. त्याला निदान दोन घटे तरी लागतील. पाचच्या सुमाराला गावात जायला निघू आपण. कॉमिनॉस हॉटेलात जेवू. कशी आहे कल्पना?"

"म्हटल ना, चागली आहे. स्वतः शिजवून स्वत खायचा फार कटाळा आलाय मला. रुचिपालट होईल"

"बरं तर मग, मी आलोंच."

एलिसा म्हणाली, "तुम्ही येईस्तोवर एवढी नवी कलम सहज लावून होतील माझी."

हेन्री 'स्कॉटी'ला हाकारत कोठीकडे गेलेला तिन पाहिला. त्याच्या हाका कानावर येत होत्या. मग दोघे मिळून टेकडीच्या फिक्कट पिवळ्या चढावरून घोडे दौडवीत गेलेले तिनं पाहिल

नवी रोपटी लावण्यासाठी छोटासा चौकोनी भुसभुशीत जमिनीचा तुकडा तयार करून ठेवलेला होता. एलिसान जवळच्या परतण्यान त्यातली माती पुनःपुन्हा परतून तो तुकडा मऊसूत केला. थोपटून सपाट आणि घट्ट बनवला. मग कलम रोंवण्यासाठीं एका ओळीत दहा खड्डे तिनं खणले. वाढलेल्या क्रायसॅंथेमम्सच्या वाफ्याशी जाऊन तळापासची छोटीं कोवळी रोपं तिन न दुखावता बाहेर काढली. कैचीन त्याचीं छोटी छोटी पानं छाटून टाकलीं आणि त्याची जुडी ती रचू लागली.

सडकेकडन गाडीच्या चाकांचा कुई कुई आवाज, घोड्याच्या टापाची टप्टप् ऐकू आली. म्हणून एलिसान तिकडे पाहिलं. गावची सडक नदीकाठच्या राईतून गेली होती.तिथून एक अजब प्रकरण सथपणें रागत येत होतं. ती एक जुनाट धमणी होती. कॅन्व्हासच गोल छप्पर तिला छकड्यासारखं लावलेल होत. एक म्हातारा थोराड घोडा आणि एक भुरं पाढर मरतुकडं तट्टू तिला जुपलेल होत. छपराच्या खाली आखूड दाढीचा आणि मोठाड अंगाचा एक माणूस बसला होता आणि गाडी हाकत होता. गाडीच्या मागच्या चाकाच्या मधून एक हाडकुळ गावठी कुत्रं पाय ओढीत चालत होत. छपराच्या बाहेरच्या अगाला मोठाल्या बेढब, वेड्यावाकड्या अक्षरात लिहिलेल होत, " भाडीकुंडी, चाकूकात्र्या, गवत कापण्याचीं यंत्रे रिपेर करणार. " ' भाडींकुंडी 'पासून ' यन्त्रा 'पर्य-तचा तपशील दोन ओळीत आणि तिसऱ्या ओळीत फक्त बटबटीत मोठे शब्द. 'रि पे र क र णा र !' दर अक्षराखाली ते रंगवताना उतरलेले रगाचे ओघळ तसेच सुकलेले होते.

बसल्या जागेवरून एलिसा तें विजोड, हास्यापद, खिळखिळं, गावरान प्रकरण खडखडत समोरून पुढ निघून जाताना पहात राहिली. पण तें ' प्रकरण ' पुढ गेलच नाही. एलिसाच्या घरापुढल्या वाटेला तें वळल, उडत आणि आदळत आणि मोठमोठे आवाज करीत तिकडेच आलं. चाकांखालचा कुत्रा भुकत दौडत पुढें आला. त्याला वाडीवरच्या

दोन कुत्र्यांनीं उलट भुकून भुकून रोखण्याला सुरुवात केली. होता होता मध्येंच ती तीनहि कुत्रीं मुकी झाली, भुकायची पार थाबलींच. शेपट्या हालवीत, तंगड्या ताठ करून, मोठ्या डौलाने गोल गोल फिरू लागली, एकमेकाना मन लावून हुगूं लागली. मागला जुनापुराणा गाडा येऊन पार बागेच्या कुपणाला टेकलं आणि थोपला. पाहुण्या कुत्र्याला आता उरलेले दोघे आपल्याला भारी आहेत याची उमज पडली होती, त्यानं शेपटी पायात घातली अन् गुरगुरत, दात विचकीत ते गाडीखालीं सरकल.

गाडीतल्या बाप्यान त्याला उद्देशूनच म्हटल, " एकदा लढू लागल म्हणजे फार वाईट जनावर आहे तें. "

एलिसा हसली. म्हणाली, " दिसतय् खर. लढू लागायला साधारण किती वेळ घेतो हा तुमचा बिबट्या वाघ ? "

तिचच हास्य आता त्या माणसान उचलल आणि शिगेला पोचवलं. खोः खोः हसून तो म्हणाला, " कधी आठवडा, कधी पधरवडा. कधी कधीं जास्त. " चाकावरन अल्लद उडी मारून तो उतरला. सुकल्या फुलासारखी गाडीची विजोड जनीवर लळतलोंबत उभीं होती.

गडी खरंच धिप्पाड होता हें एलिसान पाहिल. त्याची दाढी आणि केस पिकूं लागले असले तरी तसा तो मुळीच वयाचा दिसत नव्हता. अगातला विटका काळा सूट पार चुरगळला होता अन् त्याला वगणाचे डाग पडले होते. एव्हाना त्याच्या मुद्रेवरून, डोळ्यातून हसू मावळल होत. त्याचे डोळे होते काळेभोर. कसल्या कसल्या विचारानीं तुडुंब भरलेले होते. फिरस्त्या, भटक्या पेशाच्या माणसाच्या डोळ्यातच दिसणारा हा विचाराचा कालवा. कुपणावर रोवलेले त्याचे हात निबर होते, खडबडीत होते, जागोजाग फुटलेले होते. ओरखडे उठलेले होते. फुटल्या जागी एकेक रेघ कोरून निघाली होती. त्यान डोक्यावरची जुनीपुराणी हॅट वर उचलली.

तो म्हणाला, " बाई, नेहमींच्या रस्त्यापास्न दूर आलोय आम्ही.

ही सडक दिसते ही नदीपलीकडे लॉस एंजल्सच्या फाट्यालाच जाऊन मिळते काय ?"

एलिसा बसल्याची उठून उभी झाली. हातातली कैची तिनं ॲप्रनच्या खिशात सारली. म्हणाली, "हो, त्याच फाट्याला जाऊन मिळते ती सडक. पण वाटेंत मोठ वळण आहे तिला. शिवाय मधल्या वाळूतन तुमचीं हीं जनावरं गाडी ओढू शकतीलसं वाटत नाहीं मला."

जराशा अभिमानान आणि गर्वान तो इसम म्हणाला, "छेः छेः! जनावरं दिसतात मरतुकडी, पण त्यांच्या खऱ्या ताकदीची तशी पाहून कल्पना यायची नाही तुम्हाला बाई. चालायला फार काटक आहेत तीं."

"एकदा चालू लागली म्हणजे!" एलिसानं टोमणा हाणला, "चालूं लागायला साधारण किती वेळ लागतो याना ?"

त्या अनोळखी माणसाच्या जीवणीवर क्षणभर हंसू झळकल. तो म्हणाला, "आमच्या कुत्र्याइतकाच. कधी आठवडा. केव्हा पंधरवडा. आणि कधी जास्तसुद्धा!"

"हें बघा," एलिसा हसू आवरून म्हणाली, "मला वाटत, सालिनास रस्त्याकडेच आलात तसे मागें जाऊन तुम्ही मोठ्या फाट्याला मिळाल तर बराच वेळ वाचेल तुमचा."

कुपणाची तार आपल्या भरदार बोटान ततुवाद्यासारखी छेडून त्यान तिच्यातून सूर काढला. तो एकदम म्हणाला, "घाई मुळीच नाही, बाई. दरसाल आम्ही सिॲटलहून निघून सान दायगोला जातो आणि तिथून परत सिॲटलला येतो. जायला सहा महिने. परत यायला सहा महिने. अशी वर्षं जातात. घाईपेक्षा हवा त्यातल्या त्यात बरी मिळाली तर पहातो. म्हणून वाट पुसली."

एलिसान हातमोज हातातून काढले आणि 'ॲप्रन'च्या खिशात कैचीबरोबरीनं खुपसून ठेवले. डोक्यावरच्या पुरुषी हॅटच्या आंतल्या कडेन तिन बोट फिरवलीं. बाहेर आलेल्या तुरळक बटा आत सारल्या. ती म्हणाली, "गमतच आहे एकूण."

तो काहीं 'आतली' गोष्ट सागावी तसा कुपणावर रेलला. म्हणाला, "तें गाडीवरच लिहिलेल वाचलच असेल तुम्ही. आम्ही फुटलेलीं भाडीं दुरुस्त करतों, झालच तर बादल्याना बुड बसवतो, चाकूकात्र्याना धार करतों. काही आहे का करायचं तुमचं ?"

"छेः छेः !" एलिसा तत्काळ उत्तरली, "काऽहीसुद्धा नाहीं." तिच्या डोळ्यात आता प्रतिकाराचा मख्खपणा उतरला.

"कात्र्याना धार करण फार कठीण." तो बोलत राहिला, "धार करायला म्हणून जातात आणि कात्रीच मातेरं मात्र करतात. पण आपल तस नाही. फर्स्टक्लास धार लावून देतों. स्पेशल हत्यार आहे आपल्याकडे. आहे बोटभर, पण अगदी पेटंट आहे बघा. धार म्हणजे धार लावतय बघा."

"नको. आमच्या कैंचीला चागली धार आहे अजून."

"आहे तर असू द्या. भाड पहा एखाद असेल फुटलेल, पोचे आलेल, वाकलेल, मोडलेलं. एकदम नवं करून देऊ. नव घ्यायला नको. थोडक्यात काम."

"अह." एलिसा तुटकपणें म्हणाली, "म्हटल ना, काही करण्यासारख नाही सध्या आमच्याकडे."

त्याच्या मुद्रेवर आता काहीसा नाटकी खट्टूपणा उमटला. त्याचा सूर, लहान पोराचा तक्रार करताना होतो तसा झाला. तो म्हणाला, "बाई, सकाळधरन नावाला काम नाही मिळाल. फुटका चव्वल नाही दिसला. रात्री पोटाला उपास घडणार. काय सागाव, सरावाची वाट सोडून या बाजूला आलो आणि फसलों, झाल. तस सिएँटलपासून सान दायगोपर्यंत मोठ्या सडकेला घरन् घर ओळखतय् बघा आम्हाला. काम मुद्दाम काढून ठेवून देतात. आपल काम एकदम चोख हे माहीताय् त्याना. पुन्हा दाम कमती."

या कोडगेपणान आतां जरा नाराज होऊनच एलिसा निश्चयान म्हणाली, "नाही म्हटल तर. काहीसुद्धा काम नाही आमच्याकडे."

त्याची धीट नजर तिच्या चेहऱ्यावरून खालीं उतरली. भुई धुडूं लागली. फिरत फिरत क्रायसॅंथेमम्सच्या वाफ्यावर खिळली. “कसलीं झाड बाई ही?” त्यान उत्सुकता दाखवीत विचारल.

क्षणात एलिसाच्या मुद्रेवरची नाराजी, मख्खपणा, निश्चय सगळा मावळला. ती म्हणाली, “ती होय. ती क्रायसॅंथेममचीं झाड मोठाली पाढरीं पिवळी फुल येतात त्याना. दरसाल माझ्या फुलाएवढी फुल या भागात कुणाची नसतात.”

“म्हणजे तें लाब देंठाच फूल? रगीत धुराचा असा भपकारा फुकावा तस दिसत बघा!”

“तेंच तें. किती छान वर्णन केलत तुम्ही!”

“आल लक्षात आता. सवय होईस्तवर वास उग्र वाटतो त्याचा”

“उग्र नसतो काही.” एलिसान जोरानं बजावलं, “स्ट्रॉंग असतो, पण असतो छान.”

त्यान तत्काळ आपला रोख बदलला. “हो, तेंच! आपल्याला पण भारी आवडतो तो वास.”

एलिसा अभिमानाच्या सुरात म्हणाली, “यंदा दहा इंच आसाची फुलं काढलीं होतीं मीं.”

तो इसम आता कुपणावर आणखीन् रेलला. म्हणाला, “बघा बाई. मोठ्या सडकेला तिकडे एक बाई आपल्या माहितीची आहे. आहे साधीसुधीच; पण तिच्या बागेसारखी बाग आपण पाहिली नाहीं. म्हणाल ती फुलझाड आहेत बघा तिच्या बागेंत.नाहीं काय तें क्रायसॅंथेमम. बस्स! गेल्या वर्षाला बघा, पितळेची बादली फुटली होती तिची, तिला बूड बसवत होतों. भारी जिकिरीचं काम, पण एकदम फर्स्ट क्लास करून देतों आपण. हां! बूड नवा की जुना कळणार नाहीं! तर बाई म्हणाली, ‘तुम्हाला कुठं चागलीं क्रायसॅंथेमम्स दिसलीं तर माझ्याकरता थोड बी तेवढं घेऊन या.’ मी म्हणालों, ‘हो, आणीन की.’ त्यात काय तोशिस पडते आपल्याला?”

एलिसाच्या नजरेंत आता सावधगिरी आणि उत्सुकता उतरली. म्हणाली, "बाईला क्रायसॅंथेमम्सची काय कल्पना असणार म्हणा! बीं लावून रोपं काढता येतात त्याची, पण सोपा मार्ग म्हणजे हीं इथं दिस-तात ना, अशी कोवळी कोवळी रोपटी लावणं."

"अच्छा!" तो उद्‌गारला. "त्या बाईसाठी न्यायला नाहीच जमणार तर मग आम्हाला काही."

"तें का? न्या की." एलिसा एकदम बोलून गेली, "ओलसर मातीत लिंपून देतें मी थोडी रोप तुमच्याकडे, ती द्या त्याना नेऊन. कुडींत रुजतील ती, ती पण ओलसर मात्र ठेवली पाहिजेत. मग बागेंत लावणं कठीण नाही जाणार."

"त्या बाईला भारी आनंद होईल बघा चागली आहेत म्हणता ना हीं?"

"चागलीं? उत्तमच आहेत." एलिसा उत्साहानं म्हणाली. तिच्या नज-रेंत चमक आली. हॅट काढून तिन मस्तकावरचे काळेभोर कॅंस खळखळून मोकळे सोडले. "हें बघा, मी कुंडीत लावूनच देतें तुम्हाला. तशीच घेऊन जा म्हणजे झाल. या माझ्या मागून."

तो इसम मग फाटकातून आत येईस्तोवर एलिसा गडबडीनें, दुतर्फा जिरेनियम्सनी फुललेल्या पायवाटेन घराच्या परसूकडे धावली-देखील. ती परत आली तेव्हा तिच्या हातात होती एक मोठी लाल कुडी. आपल्याकडे हातमोजे आहेत हें ती विसरूनच गेली होती. भुईवर ती वाकली, वाफ्यातली माती तिन कणखर बोटानी उकरली आणि ती भरभरा त्या नव्या, स्वच्छ कुडीत भरली. मग कोंवळ्या रोपट्याची करून ठेवलेली छोटी जुडी तिन हातात घेतली. आपल्या भरदार बोटानी तीं रोपटीं तिनं एकेक करून मातींत पुरली. भोंवतालची माती थापून सपाट केली. तो इसम जवळच उभा राहून वाकला होता. हें सारं पहात होता.

"हें बघा. याचं कसं नि काय करायचं तें सार मी तुम्हाला सागून

ठेवतें." ती त्याला म्हणाली. "तें नीट लक्षात ठेवा आणि त्या बाईला सागा. सांगाल ?"

"हो. निदान लक्षांत ठेवण्याचा प्रयत्न करीन."

"बघा तर. ही रोपटीं सुमारें महिन्याभरात रुजून येतील. मग ही न दुखावता काढून जमिनींत पुरायची. जमीन ही अशी सकस मातीची मात्र हवी. दोन-दोन रोपट्यात निदान फुटाचं अंतर तरी हव. काय ?" त्याला दाखवण्यासाठी तिन हातात मूठभर माती उचलून त्याच्यापुढें धरली होती. "एवढ केल की भराभर वाढतील. आणखी एक गोष्ट विसरायची नाही. जुलैमध्यें झाड जमिनीपासून फार तर आठ इंच रहातील इतकीच ठेवून बाकी छाटायची."

"बहर यायच्या आत ना ?" त्यान विचारल.

"हो. बहर यायच्या आत." तिची मुद्रा उतावीळीन नुसती फुलली होती. "पुन्हा तितकीच वाढतील ही. सप्टेंबरअखेरीअखेरीला टपोरे कळे येतील याना."

ती मध्येंच बोलायची थाबली. तिच्या मुद्रेवर गूढ भाव उमटला. जरा चाचरतच ती म्हणाली, "कळे येतात तेव्हा फार काळजी घ्यावी लागते या झाडाची. म्हणजे, कस सागाव तुम्हाला तेंच समजत नाहीं मला !" त्याच्या डोळ्यात खूप खोलवर तिन शोधक टक लावली होती. ओठ किंचित् विलग पडले होते आणि अस वाटत होत की, काहीतरी ती एकटीच कान देऊन ऐकते आहे. "सागतें बघा." ती म्हणाली, "तुम्ही कधी हातगुणाबद्दल ऐकलय् ? म्हणजे त्या- नेहमीच्या नव्हे, झाडाची निगा राखण्याच्या गुणाबद्दल ?"

"ऐकलय् अस कस म्हणू ?"

"तर या हातगुणाच्या माणसाला कस वाटत तें सागतें तुम्हाला. वरकड कळे असतात ना, ते खुडताना वाटतं की, बोटाच्या टोकाना जणूं नवा जीव फुटलाय्. म्हणजे कळे खुडताना तीं आपल्याला दिसतात,

त्याचीं तीच तें काम करीत असतात बघा. हें असं होतय् तें अगदीं कोपरापर्यंत प्रत्यक्ष जाणवत आपल्याला. बोटानाच सगळ जणू कळत असत. चुकूनहि चुकत नाहीत ती. ती चुकत नाहींत, चुकणार नाहीत हें-दिखील जाणवत. अस असत सार. आणि म्हणून काहीं चूक घडणच शक्य नसत. काय म्हणतें मी? येतय् का लक्षात? समजतय् का मी काय म्हणते तें?"

जमिनीवर गुडघे टेकून बसल्याबसल्या ती वर त्याच्याकडे पहात होती, विचारीत होती धाप लागल्यासारख तिच वक्षस्थळ जोरजोरान वरखालीं होत होत

त्याचे डोळे किलकिले झाले होते. ती आपल्याकडे पहाते आहे हे जाणून तो लाब कुठ तरी पहात होता. तो म्हणाला, "येतय् थोड थोड. केव्हा केव्हा रात्रीच्या वेळीं, त्या गाडीत पडल्या पडल्या—"

एलिसाच्या आवाजात आता पुरुषी राकटपणा आला. त्याच वाक्य तिन अर्धच छाटल. "हो, तुमच्याप्रमाण अनुभव नाही मला, पण मला माहिताय् तुम्ही काय म्हणता ते. रात्रीचा काळामिट्ट अधार ताऱ्याना नुसत तेज चढत, झळाळी— धार चढते काटा फुलतो. आणि—आणि भोवती चिडीचिप् शातता. कुठ हू नाही कीं चू नाही. आणि आपण उच उच जात रहातो, वर वर जात रहातो. खूप वर जातो, अगदी, ताऱ्याची अणकुचीदार टोक आपल्यातून आरपार जातात आणि तरी आपण वरच जात रहातों. असच असंच असत ते. भाजणार, मन कातरणार, आणि— आणि सुदर."

तिथ तस वाकल्या वाकल्या आता तिचा हात, मेणचट काळ्या तुमानीतल्या त्याच्या पायाकडे गेला. तिच्या कचरत्या बोटानी जवळ जवळ त्या तुमानीला स्पर्श केला. आणि एकदम निर्जीव होऊन तो हात जमिनीवर पडला—एखाद्या लाळघोट्या कुत्र्यासारखी ती त्या पायाशी वाकली होती.

तो म्हणाला, "तुम्ही म्हणता तसंच असत बघा. फार छान असतं तें. फक्त पोटात अन्न नसलं म्हणजे छान नाहीं वाटत."

आता ती एकदम लगबगीन उठून उभी राहिली. अगदीं ताठ उभी राहिली. तिच्या मुद्रेवर शरम होती. तिनं कुडी त्याच्यासमोर धरली, हळुवारपणें त्याच्या हातीं ठेवली. म्हणाली, "ध्या.तुमच्या गाडीत ठेवा.दिसेल अशी ठेवा म्हणजे लक्ष राहील. तुमच्यासाठी काही काम बघतें असल तर." परसदारीं फुटक्या मोडक्यातोडक्या जुनाट डबक्याच्या ढिगातून तिन पोचे आलेली दोन भाडीं उपसून काढली. ती घेऊन त्याला नेऊन देत ती म्हणाली, "ह, ही दुरुस्त झालीं तर पहा."

त्याचा नूर एकदम पालटला. तो एकदम धदेवालाच झाला. म्हणाला, "पार नवी करून देतों बघा. कळणारदिखील नाहींत जुनीं आहेत तें." गाडीच्या मागल्या अगाला त्यान 'दुकान' माडल. छोटी ऐरण काढून पुढें ठेविली. तेलकटलेल्या, हत्याराच्या पेटींतून एक हातोडी काढून घेतली. भाड्याचे पोचे हातोडीच्या आघातानी तो काढीत असताना बघण्यासाठी एलिसा फाटकातून आत आली. त्याच्या जिवणीवर आत्मविश्वास आणि निर्धार उतरला होता. घावावर घाव घालीत असता जर अवघड जागा आली की तो खालचा ओठ तोंडात ओढून त्यावर दात रोवत होता.

"तुम्ही रोज गाडींतच झोंपता?" एलिसान विचारलं.

"हो. गाडीतच बाई. पाऊस असो का उन्ह असो, गाडीचा निवारा तर कुठ जात नाहीं! छपराखाली गप्गार पडून रहातो."

ती म्हणाली, "मजा. फारच मजा असेल, नाही? मला तर वाटत बायकाना असल्या गोष्टी करता यायला हव्या होत्या."

"छेः छेः! बाईमाणसाला असल जिण खर नव्हे, बाई."

तिचा खालचा ओठ किंचित् विलगला. शुभ्र दात ओझरते दिसले. "कसं काय म्हणू शकता तुम्ही अस?" तिन रागानच विचारल, "काय अनुभव आहे हो तुम्हाला?"

तो म्हणाला, "अनुभव कुठून असायला बाई? अनुभव काहीसुद्धा नाही. काहीच कळत नाही आपल्याला त्यात. ही तुमचीं भाडीं दुरुस्त केलेलीं. नवी नकोत आता विकत घ्यायला तुम्हाला."

"काय द्यायचं याचं?"

"द्या काय मर्जीला येईल तें. किंवा पन्नास सेंट द्या. आम्ही नेहमी भाव माफक लावतों अन् काम चोख करतों. म्हणून तर मोठ्या सडकेला जागोजाग आमची बाधलेली गिऱ्हाइक पसरलेलीं आहेत."

एलिसान घरातून पन्नास सेंटच नाण आणलं आणि त्याच्या हातात वरूनच टाकल म्हणाली, "पुढेंमागें तुमचा धदा बसला तर आश्चर्य करू नका! मला कैचीला उत्तम धार लावता येते. झालच तर छोट्या भाड्याचे पोचे पण काढता येतात. बाईमाणूस आहें यावर जाऊ नका."

त्यान त्याचा हातोडा तेलकट पेटींत टाकला नि ऐरण गाडींत सरकवली. म्हणाला, "बाईमाणसाच्या दृष्टीनं एकदम फटिंग जिणं आहे आमचं, बाई. कधीं काय होईल त्याचा काय नेम? रात्रभर गाडीखालून कसकसले जीवजिवाणू फुसफुसत फिरत असतात." तट्टाच्या पाढऱ्याशुभ्र ढुगणावर थाप ठेवून तो टुण्‌दिशी गाडीच्या पुढच्या बैठकीवर स्वार झाला. ऐसपैस बसकण त्यान मारली, कासरा हातात धरला. म्हणाला, "उपकार झाले बाई तुमचे. तुमच्या सागीप्रमाणं करतों. परत माघारी जाऊन सालिनासचा फाटाच पकडतों."

"आणि हें बघा, तिकडे पोचायला वेळ उशीर लागला तर माती ओलसर ठेवायला विसरू नका." तिन बजावल.

"माती?.. माती, बाई? हा हा. माती! अगदी नक्की ठेवतों. क्रायसॅंथेमम्सच म्हणालात तुम्ही. त्याची काही काळजी करू नका तुम्ही." त्यान तोंडान चित्रविचित्र आवाज करून जनावराना हाकारल. सुस्ताई सोडून तीं हुशारलीं. गाडीच्या मागल्या चाकामधोमध कुत्रं जाऊन उभं राहिलं. गाडीन मोहरा फिरवला आणि फाटकावाटें, आल्या वाटेनं ती नदीच्या दिशेनं खडखडत परत निघून गेली.

ती सथ गतीनं तशी जात होती आणि एलिसा कुंपणाशी उभी राहून, ती तशी जाताना पहात होती. तिचे रुंद खांदे ताठ होते, भरदार मस्तक उंचावलेलं होतं, डोळे किलकिले झाले होते. समोर लांब लांब जात होतं तें अस्पष्ट, धूसर स्वरूपातच नजरेंत शिरत होतं, मनात उतरत होतं. तिचे ओठ हलले, अगदी पुसट शब्द उमटले, " गुडबाय— गुड-बाय, " मग ती हळूवारपणें पुटपुटली, " वाट उजळली आहे. त्या तिथं प्रकाश आहे . " आपल्याच शब्दांच्या उच्चारानं ती दचकली. तिनं मस्तक झटकलं. तें सारं झाडून टाकलं. कुणी ऐकलं तर नाही ना म्हणून भिरभिर सभोंवती पाहिलं, पण ऐकलं होतं फक्त कुत्र्यानींच त्यानी धुळींत सुस्त पडल्यापडल्याच एकदा डोकं वर करून तिच्याकडे पाहिलं आणि जास्तच पसरून, डोळे मिटून ती पुन्हा झोपून गेली एलिसा वळली, धावतच घरात गेली.

स्वयंपाकघरात शेगडीशी जाऊन तिनं साठ्याच्या पाण्याच्या टाक्यात हात बुडवला.चरबरून चटका बसला.दोनप्रहरच्या स्वयंपाकाच्या उष्णतेनं पाणी चांगलं रटरटलं होतं. ती न्हाणीघरात शिरली अंगावरचे मातटलेले कपडे तिने टराटरा ओढून काढले, कोपऱ्यात फेंकले. आणि मग खापरीच्या तुकड्यानं ती खसाखसा सगळं अंग घासू लागली. पाय, मांड्या, कंबर, छाती, हात—खरवडून लाल होईपर्यंत तिनं सारं घासलं. भसाभसा पाणी अंगावर घेतलं. ऊन ऊन पाणी, चटके देणारं, पोळून काढणारं पाणी. अंग पुसून ती झोपायच्या खोलीच्या आरशापुढें येऊन उभी राहिली. आपलं सारं अंग तिनं त्या आरशात न्याहाळलं, पोट आत घेंतलं, छाती पुढं काढली. वळून खांद्यावरून शरीराच्या मागल्या भागाच्या प्रतिबिंबावरून सावकाश नजर फिरविली – किलकिल्या डोळ्यानीं.

आणि मग थोड्या वेळानं, सुस्तावल्या गतीनं ती कपडे चढवू लागली. नवे शिवलेले कपडे तिनं चढवले. ठेवणीतले मोजे पायात घातले. ती ज्यात सुंदर दिसे तो तिचा आवडता झगा परिधान केला.

मग तिन मन लावून आणि काळजीपूर्वक केसाच प्रसाधन केलं. भुंवया रेखल्या. ओठाना लाली लावली.

हें करून संपत आहे तों घोड्याच्या टापाचे तुरळक आवाज बाहेर उमटले. हेन्रीच्या आणि त्याच्या गडयाच्या आरोळ्या ऐकू आल्या. दोघे मिळून घोडयाना पागेंत नेऊन घालत होते. पागेचा दरवाजा धडाड्दिशी लावला गेल्याच ऐकू आल. आणि हेन्रीच्या आगमनासाठी तिन मन घट्ट केल.

ओटीवर पावल वाजलीं. तो घरात शिरला तो ओरडतच, " एलिसा! कुठ आहेस तू? एलिसा!– "

" माझ्या खोलीत कपडे बदलतेंय् मी. अजून तयारी झाली नाही माझी. तुमच्या अघोळीसाठी पाणी गरम करून ठेवलय्. लौकर अघोळ करा. उशीर होईल नाहींतर. "

आणि मग तिला टबात बसून हेन्री पाणी चुळबुळताना ऐकू आला, तशी तिन त्याचा सूट काढून पलंगावर ठेवला. जवळच त्याचा शर्ट, टाय् आणि पायमोजे ठेवून दिले. पलगालगतच त्याचे बूट तिनं भितीला टेकून उभे केले. मग ती ओटीवर गेली आणि आपल्याच तोऱ्यात तिथ निश्चल बसून राहिली. तिन नदीकडे जाणाऱ्या सडकेकडे पाहिलं. पिकल्या पानानीं सडकेची कडा अजूनहि पिवळी दिसत होती. त्यामुळें वरच्या दाट धुक्याखालीं उन्हाची एक लाब चोरटी तिरीप पडावी तस काहींतरी तें दिसत होत. त्या कुंद दुपारीं तेवढच काय तें चैतन्य शिल्लक होत. बस्स! तेवढच. बराच वेळ ती तशी त्या उरल्या-सुरल्या चैतन्याकडे टक लावून पहात निःस्तब्ध बसून राहिली. क्वचित्च तिच्या पापण्या मिटत होत्या.

आणि मग हेन्री मोठा आवाज करीत दरवाज्यावाटें बाहेर आला. येताना एकीकडे तो जाकिटात टाय् खुपसतच आला. बसल्या जागीं एलिसा ताठरली, तिची मुद्रा गोठली. हेन्री मध्येंच जणू नकळत थाबला

आणि तिच्याकडे पाहू लागला. "ओहो ! एलिसा ! काय छान दिसतेस ग तू!"

"अं ! छान ? खरच मी छान दिसतें ? छान म्हणजे कशी दिसतें ?"

हेन्री गडबडला. "तें काय की बुवा ! पण तू एकदम वेगळी दिसतेस. रसरशीत आणि – आणि आनदी."

"रसरशीत ? रसरशीत म्हणजे कशी ?"

हेन्रीच्या मुद्रेवर गोंधळ उमटला. अस्पष्टपणेंच तो म्हणाला, "एलिसा, थट्टा चालवली आहेस होय माझी ? थट्टेखोर आहेसच नाहीतरी तूं. तू–तू इतकी रसरशीत आणि–आणि इतकी निरोगी नि आनदी दिसते आहेस कीं–की एखाद पारडू गुडघ्यावर मोडून कलिंगडासारख खाशील बघ !"

क्षणभर तिचं सार अवसान तिला सोडून गेलं. स्वतःला कशीबशी सावरीत ती दटावणीच्या सुरात म्हणाली, "हेन्री,अस बोलू नको ! तूं—तुम्ही काय म्हणालात त्याचा अर्थ तरी कळला का तुम्हाला ?" तिचा स्वतः-वरचा ताबा पुन्हा परत आला. ती कुर्‍यांन म्हणाली, "मी आहेंच निरोगी. किती तें माझ मलासुद्धा याआधी ठाऊक नव्हत."

हेन्री लांब ट्रॅक्टरच्या शेडकडे पहात राहिला. आणि त्याची नजर परत तिच्याकडे आली तेव्हां ती त्याची स्वतःची, नेहमींची होती. "मी गाडी काढतों. तोंवर तू कोट चढवून ये बर तुझा."

एलिसा घरात गेली. त्यानं गाडी फाटकापुढ आणून उभी केलेली तिन ऐकली. यत्राची घरघर चालू होती. मग मुद्दामच तिन हॅट डोक्या-वर ठेवायला वेळ लावला. थोडी इकडे दाब, तिकडे ओढ असं ती करीत राहिली. हेन्रीन मोटार अखेर पुरती बद केली, तेव्हाच तिनं कोट चढवला आणि ती बाहेर गेली.

नदीकाठच्या सडकेनें ती छोटी गाडी हादरत, उडत निघाली. तिच्या आवाजान पक्षी झाडातून उडत होते, ससे झुडपांत दडत होते. झाडाच्या शेंड्यावरून दोन बगळे जडपणें उडाले आणि नदीच्या पात्रांत जाऊन उतरले.

सडकेवर, पुढें, खूप लाब एलिसाला काळा ठिपका दिसला. तिला काय तें उमगल.

तें जें काहीं होत ते माग टाकून पुढें जाताना तिकडे न बघण्याची तिन कोशिस केली, पण डोळे तिचे उरले नव्हते स्वतःशींच ती खिन्न-पणें म्हणत होती, "त्यान खर म्हणजे ती रस्त्याकडेलाच फेंकून द्यायचीं, त्याला किती वेळ लागणार होता? पण त्याला कुंडी हवी असेल, नवी कोरींच तर आहे ती त्यामुळ ती रोप तो फेकून देऊ शकला नसेल, इतकच. हो, इतकच."

गाडीन आता वळण घेतल आणि पुढेंच तिला ती छपरी धमणी आणि तिच्यावरचीं अक्षरं दिसली. घाईनंच तिन नवऱ्याकडे मोहरा फिरवला, नको तों अजब, दरिद्री गाडा नि त्याला जोडलेली ती विजोड जनावर दिसायला नकोच!

एकच क्षण, आणि तो गाडा दिसेनासादिखील झाला. तिच्या मनासारख झाल. आणि म्हणून तिन माग वळून पाहिल नाहीं.मोटारीच्या आवाजाच्यावर पट्टी नेऊन ती मोठ्यादा म्हणाली, "रात्री मजा येईल! खूप दिवसानतर रुचीन जेवणार मी."

"झाल!" हेन्री तक्रारीच्या सुरात म्हणाला, "पुन्हा बदललीस तू! फार लहरी बुवा तू!" मोटारीच्या चाकावरून एक हात काढून त्यान तिची माडी प्रेमान थोपटली. "अधूनमधून सारख जेवायला बाहेर नेल पाहिजे बघ तुला. आपल्या दोघाच्या दृष्टीन चागल होईल तें. वाडीवर उबून जातो अगदीं आपण."

"हेन्री," तिनं विचारल. "जेवणावर दारू मिळेल आपल्याला?"

" हो हो. न मिळायला काय झालं ! "

किंचित्काळ ती गप्प होती. मग ती म्हणाली, " तुमच्या त्या बॉक्सिंगमध्यें माणस रक्त काढतात नाही एकमेकाचं ? खूप इजा करतात ? "

" कधी कधी होते थोडीफार इजा. पण नेहमींच नव्हे काही. का ग ? "

" उंहू, उगीच. एकमेकाची नाक फोडतात लढताना आणि मग रक्ताच्या धारा वाहू लागतात छातीवरून– अस काहीतरी ऐकलंय् मी. रक्तान मुठीतले ते चामड्याचे मोजेदिखील चिकाचिकीत होतात अस कुठतरी वाचलय्. "

त्यान वळून तिला मूढ नजरेन न्याहाळल. " तुला झालय् तरी काय एलिसा ? असल काहीं तू वाचत असशीलस वाटल नव्हत मला." त्यानं गाडी थाबवली. मग सालिनास नदीवरच्या पुलाकडे त्यान ती वळवली.

तिन विचारल, " बायका बॉक्सिंग पहायला जातात ? "

" जातात की. का नाहीं ? कोणी कोणी जातात. का विचारलस ? तुला जायचय् ? तुला तें आवडेलस वाटत नाही मला, पण म्हणत असलीस तर चल जाऊ. "

ती जागच्या जागीच लुळी झाल्यागत बसून राहिली. " छेः छेः ! भलतच ! मला नाही जायच. खरच, मला नाहीं जायचं." तिन तोंड त्याच्यापासून दूर फिरवल होत. " जेवल्यावर तेवढी दारू मिळाली की पुरे. खूप झालं मग." आपण बुळेपणान मुळूमुळू रडतो आहोत हे त्याला न कळाव म्हणून तिन कोटाची कॉलर कशीबशी वर करून घेतली. तिला वाटल कीं, एखाद्या थेरड्या स्त्रीसारख्या आपण रडतों आहोत.

* * *

# हॉर्टेन्स कॅलिशर

मॅनहॅटन शहरी इ स. १९११ मध्यें जन्मल्या. आज तेथेंच वास्तव्य. दोनदा गगेनहेम फेलोशिप्सचा मान मिळविला. १९५८ मध्यें अमेरिकन सरकारच्या सास्कृतिक कार्यक्रमाचा भाग म्हणून बाईनीं मध्यपूर्वेचा दौरा केला. त्याची पहिली कथा 'मिड्ल ड्रॉअर' १९४८ मध्यें 'न्यूयॉर्कर' या विख्यात अमेरिकन नियतकालिकात प्रसिद्ध झाली. १९४९ च्या ओ. हेन्री स्मारक–पारितोषिक–योग्य कथात हिचा समावेश करण्यात आला 'न्यूयॉर्कर', 'हार्पर्स मॅगेझिन' आणि इतर नियतकालिकातून बाईचें लेखन प्रसिद्ध होतें. 'इन् द ॲब्सेन्स ऑफ एजल्स' नावाचा कथासग्रह १९५१ मध्यें प्रकाशित झाला. नुक्तीच एक कादबरीहि प्रकाशित झाली आहे. प्रस्तुतची 'इन् ग्रीनाविच देअर आर मेनी ग्रॅव्हेल्ड वॉक्स' नामक कथा १९५० साली 'न्यूयॉर्कर'मध्यें प्रसिद्ध झाली. योग्य मातापित्याच्या अभावीदेखील आपल्या आयुष्यातल्या एकेक प्रश्नाची जबाबदारीनें सोडवणूक करणाऱ्या शिकलेल्या दोन तरुण जिवाची ही कथा आहे.

गा

ठ

ऑगस्टच्या आरंभींची एक दुपार. पीटर बर्ज नुक्ताच आपल्या आईला ग्रीनाविच सॅनिटोरियममध्यें सोडून घरी आला होता. तिला मधूनमधून तिथें जाऊन रहाव लागे. वर्षामागें सैन्यातून परतला तेव्हापासून पीटर आपल्या आईबरोबर सध्याच्या या छोट्या जागेत रहात होता. आता तो घरात आला आणि दुलदुलीत कोचात त्याने बैठक मारली. आजवर एकाकीपणा कधी जाचला नाही, पण आता मात्र सहन होण्यापलीकडे तो जातो आहे अस त्याला वाटल. अगान पीटर चागला धडधाकट आणि उंचेला होता. त्याच वय तेविशीच होत. चेहरा उमदा होता. पीटरच नितळ, दर्जेदार व्यक्तिमत्व सकस अन्न, चागल्यापैकीं दतवैद्य, उत्तमोत्तम शाळा आणि आखूड, एकसारख्या लाबीच्या

केंसाची काळजीपूर्वक मशागत, यांच्यायोगें पद्धतशीरपणें घडलेल होतं. अर्धवट उघडलेल्या खिडकीवरल्या पडद्यावाटें खोलींत हळूहळू उष्मा भरत होता. त्यान पीटरचा पांढराशुभ्र 'टी' शर्ट त्याच्या छातीला, दंडाना चिकटला होता. जुलैमध्यें पीटर आपल्या एका चुलतभावाकडे बोटीनें गेला होता. हा भाऊ 'साउड' भागात रहात होता. आठवड्या-भराच्या या सागरी प्रवासानं पीटरचे दंड, छाती याना एक गव्हाळी कांति चढली होती. अजून ती तशीच होती. चुलतभावाचं कुटुंब मोटारगाडी-वाल, क्लबात जाणाऱ्यापैकीं होत. शहरची हवा खाणार होत. खेड्यात आईला घेऊन लहानपणापासून रहाणाऱ्या पीटरकडे ही मंडळी जरा नाक मुरडूनच पहाणारी होती. लहानपणीं जेव्हा जेव्हा पीटरला त्याच्याकडे जाव लागलं तेव्हा तेव्हा त्याचा धडधाकटपणा, या लोकानीं मनोमन विस्मय आणि अचंबा करीतच पाहिला होता. 'बिचाऱ्या ॲनचा तो पोरगा' या शब्दानीं 'खाजगीं'त ज्याच वर्णन घडे, तो मुलगा असा निरोगी आणि चारचौघासारखा निघावा हें जणू त्याना मानवल नव्हत. तो या मंडळीकडे या खेपेला गेला होता तोदेखील नाइलाजानच परदेशी, लाब कुठ तरी,जिथ युद्धाच्या काळात जाव लागल नव्हत तिथ जाण्या-साठीं त्यान खर म्हणजे काहीं पैसे साठवले होते, पण आईला सॅनिटोरि-यममध्यें ठेवण्यात ते खर्च होणार आणि जेमतेम, पत्रव्यवसायाच्या शाळेंतल्या पुढल्या अखेरच्या वर्षाची फी भागेल एवढेच जवळ उरणार अस दिसल तेव्हा मग नाइलाजानं तो चुलतभावाकडे गेला मनातला बेत मनातच कोलमडल्याच्या निराशेनं, तसच, रहाण्याचा आग्रह कर-णाऱ्या चुलतभावापासून वेळीच सुटका व्हावी म्हणूनहि, पीटरन कोल-बिया युनिव्हर्सिटीच्या उन्हाळी वर्गांत काही कोर्सेस्साठी नाव नोंदवून ठेवलं होतं. हे वर्गहि आता जवळ जवळ संपत आले होते आणि पत्र-व्यवसायाच्या शिक्षणाचं अखेरच वर्ष सुरू होण्याला अजून अवकाश होता. मधला काळ रिता होता. आईला ग्रीनविचला पोंचवण्यासाठीं आज पीटरनं वर्गांना बुट्टी मारली होती.

आता तो खिडकीकडे गेला. पडद्यावाटें त्यानं खाली वेस्ट टेन्थ स्ट्रीटवर उभ्या केलेल्या ' कॉन्व्हर्टिबल ' गाडीकडे नजर टाकली. गॅरेजला फोन करून त्याच्या ' पिकप मॅन 'ला बोलवायला हवं होतं, किंवा, जाण्याकरता दुसरं एखाद स्थळ सुचेपर्यंत त्यान स्वतः तरी ती गाडी घेऊन गॅरेजमध्यें जाऊन तिचा ' टॉप ' बसवून घ्यायला हवा होता. एरवी, गाडी या कडक उन्हात अशी तापून तिची अक्षरशः भट्टी झाली असती. आणि एरवीदेखील तिच्या ' सीट्स 'चं चामड जागोजाग तडकल होतच

आईला घेऊन तो पहाटे निघाला तेव्हा हवेंत गारवा होता. खेडे-गावातून सकाळीं जो रसरशीतपणा हवेंत भासतो तो होता. आईन सिल्कचा स्कार्फ डोक्याला बाधून घेतला होता. हात बाहेर ठेवून खाद्याभोवती लपेटलेल्या ' कार्डिगन 'मध्ये आपली इवलीशी, फुगीर हनुवटी तिन झाकून घेतली होती आणि सुटकेच्या हलक्याशार भावनेपोटी पीटरकडे ती वार-वार जवळपास आनदभरान पहात होती हवी हवी म्हणून जिवापाड हट्ट धरलेली वस्तु एखाद्या मुलाला देऊ म्हटल म्हणजे त्याच्या मुद्रेवर जो शिणला आनद उमटतो तो पीटरच्या आईच्या मुद्रेवर होता.तिचे कुरळे केंस, छोटे बूट घातलेले सडपातळ पाय,कुणी पहात आणि छोट्या, वर्तुळाकृति चेहऱ्यावर उठून दिसणार ते टोकदार, जादा बाकदार वाटणार नाक त्याच्या नजरेत प्रथम न येत, तर त्याला वाटल असत की, हें कुणी जोड-पच होत कुणीहि तरुण जोडप— सहलीसाठी शहर सोडून या भागात मोटारीन आलेल. पीटरच्या आईच्या चेहऱ्याच वैशिष्टय अस होत कीं, मद्य घेऊनहि त्यावर ओढलेपणा कधी दिसत नसे आणि कधी कधी ती मुद्रा इतकी फिक्कट, निःशक्त आणि वयावरची दिसे की बोलता सोय नसे. आताचच पहा ना. कुणाला खरदेखील वाटल नसतं, की थोडया तासापूर्वीच, रात्री दोननंतर केव्हा तरी, पीटरला जाग आली होती, ऐकू आलेल्या परिचयाच्या कर्कश, घोगरट किंकाळीनें तो ताड्दिशीं

उभा राहिला होता. नंतर मग वेदनेन भरलेली तिची ती अर्थहीन बड-बड, बडबड आणि बडबड. नेहमीच्या बडबडीहून निराळी. वेदना आणि भीति हलकी करण्यासाठी. ही बडबड—थाबणारी, थाबवता न येणारी, थाबवून चालणार नाहीं अशी. आणि छोट्या, उघडत्या मिटत्या तोंडाच्या, घरघरत्या आवाजाच्या जोडीला जास्त जास्त विस्फारले जाणारे, धुरकटलेले लुकलुकते डोळे– जणूं त्यावाटेंच श्वासोच्छ्वास कर-ण्याची खटपट त्याची मालकीण करते आहे अस वाटण्यासारखे. मग ट्रिपल ब्रोमाइडच इजेक्शन, ऊन पाण्याची अघोळ, आणि सरावान त्यानं आत्मसात् केलेल तिला बर वाटाव अस गाण. एवढ सगळं झाल्या-वर तिन उमाशाउमाशानीं रड काढल होत, ऊर फुटेस्तोवर ती ओक्सा-बोक्शी रडली होती आणि शेवटी त्याच्या छातीवरच डोकं विसावून झोपली होती. त्याहिनतर तिन त्याला जाग केल होत. तो मोठाल्या खुर्चीतच तिच्या-सकट झोपून गेला होता. अशा गोष्टीनंतर तिला दाखवावासा वाटे तसल्या दुबळ्या, दुखावल्या चागुलपणानं तिन प्रवासाच्या तयारींत त्याला थोडी-बहुत मदतदेखील केली होती. एकमेकांत शब्दहि न बोलता ही तयारी दोघानीं मिळून तडकाफडकी केली होती. तिला जाण भागच होत. त्यात शकेला जागाच नव्हती. कधी निर्माण झालीहि नव्हती.

खिडकीपासून दूर होऊन पीटर पुनश्च त्या मोठाल्या खुर्चीत येऊन बसला. एकामागून एक सिगरेट ओढू लागला. खर म्हणजे मद्यपी—किंवा अलीकडे लोक ज्याना अल्कोहोलिक म्हणत तसल्या—माणसाच्या तुलनेन त्याच्या आईचा त्रास फार कमी होता. तिचे राखीव छोटे बूट, गुळचट वासाचे ब्लाउज़, तलम आतले कपडे, आटोपशीर आणि घाटदार झगे बॅगेत भरत असता त्याच्या मनात अस आल, आई तशी उपद्रवकारक नव्हती. ती वयानुरूप अगान पसरली नव्हती की झडली नव्हती. अनेक वर्षामाग, वेळीं महिनोगणती सुरक्षितपणाची ठरेल अशी एक पद्धत तिन अमलात आणली होती. त्याला आठवत होतं त्याहि आधीपासून ती तिचा अवलब करीत आली होती. पीट-

रच्या वडलाच्या मृत्यूआधींपासून. ते स्विडिश होते, इंजिनिअर होते. त्यानी घेऊन ठेवलेल्या काही पेटट्सूच्या उत्पन्नावरच पीटर आणि त्याच्या आईच त्याच्यामागे बर चालत आल होत. किंबहुना पीटरच्या वडिलाशी तिचा संबंधदेखील येण्याआधी– एका पेण्टरकडे ती मॉडेल आणि सर्व काही म्हणून रहात होती तेव्हापासून तिन ही पद्धत पक्की केली होती. सकाळी ती रात्रीच्या अमलात उशीरसर झोपून राही, मग ती माणसात येई, स्वच्छ होईतोवरचा वेळ अनिश्चिततेचा जाई. त्यानतर दुपारी चार-पाचचा सुमार झाला, की ती कुत्र्याला घेऊन (तिला कुत्रा नेहमीच लागे.) चालत तिच्या ठिकाणाकडे जाई. छोट्या क्लबच्या स्वरूपाच आरामशीर अस तें ठिकाण. तिथच ती पहाटेपर्यंत असे. गेलीं वीस वर्षं तशी ती तिथ जात, रहात आली होती

मागे एकदा, पीटर बोर्डिंग स्कूलमध्ये होता त्या काळात, या ठरीव चाकोरीबाहेर पडण्याचा शर्थीचा प्रयत्न तिन केला होता.—पीटरच्याचसाठी अर्थात्. आणि तो परत आला तेव्हा त्याचा मुक्काम शहरात सेंट्रल पार्कच्या पश्चिमेकडल्या एका जागेंत हलला होता परतु याचा परिणाम एवढाच झाला की, टॅक्सीभाड्याचा आकडा फुगला, आणि वारवार ती नाहीशी होऊन पीटर तिला शोधून घरी आणू लागला. जुन्या घरावरून आणू लागला. उचलून, लळतलोबत. मग काही महिन्यानी पुन्हा दोघ गावात जाऊन राहिली होती. तिथ सगळे तिच्या परिचयाचे होते, तिला थोडबहुत मानणारे, समजू शकणारे रहात होते. तिथ तिला सुरक्षित वाटू लागल. वयस्क चित्रकार, नवे उगवते कवी, बातमीमागें धावणारे पत्रकार, कुत्र्याची निपज करणारे लष्करातले एकाडे अधिकारी, आणि ज्याचा नोकरीधदा कोणत्याहि प्रकारें निश्चित नाही असे लोकविलक्षण तरुण याची ती वस्ती होती. त्यानी या बाईला फार लौकर आपल्यातली एक मानली. ही टुमदार बाई—चित्र न काढणारी, साहित्य न लिहिणारी, परतु त्याची चित्र आपल्या बिऱ्हाडी

भितीवर लावणारी, त्याची मासिक निष्ठेन वाचणारी आणि त्याना चागली जाणणारी, त्याच्या रीतीभाती, सामाजिक श्रेणी, त्याचे हेवेदावे, त्याचे शब्दप्रयोग आणि एका मर्यादित स्वरूपात, मधूनमधून त्याच्या शय्यादेखील जाणणारी. त्याना ती त्याच्यापैकीच वाटली.

हेहि आपल्याला कधी माहीत नसल्याच पीटरला आठवत नव्हत. दहाव्या वर्षी मद्यपानामुळें येणाऱ्या 'हॅगओव्हर'वर अचूक औषध देण्याला तो तरबेज झाला होता. तसच, रात्रीं झोपण्याच्या पायजम्यात कुठें तरी उभा राहून, आईन घरी आणलेल्या मित्रमडळीच्या तोंडचं कौतुक ऐकत असता, आजची ही मैफल मारामारीत आणि आरड्या-ओरड्यात सपणार की काळोखातल्या चुटपुटत्या पुटपुटीन आणि कुजबुजीन तिची भैरवी होणार, हे तो अचूक ओळखायला शिकला होता.

शेवटची सिगरेट विझवून टाकताना आता त्याला वाटल की, तेव्हां-पासून आजपर्यंत आपण कधी आपल्या आईचा आणि तिच्या वेगळ्या जगाचा तिरस्कार अगर राग, द्वेष केला नाही हें मोठ विलक्षण होय. तसा विचार केला तर, जनरूढीप्रमाणे त्याच्या आईन त्याच्यासाठी शक्य ते सर्व काही केल होत. त्याला चागला घरनिवारा दिला होता, उत्तम दर्जाच्या शाळेत शिकवल होत, इतकच नव्हे, तर त्याच्या ओळ-खीच्या अनेक चागल्या कुटुबातल्या मुलाहून अधिक मायेन आणि जीव लावून तिन त्याला लहानाच मोठ केल होत. समजूतदारपणेंच, त्याच्या घराबाहेरच्या जीवनात तिन कधी चुकूनहि पाऊल टाकलं नव्हत. तिच्यामुळें त्याला कधी मान खाली घालण्याचा, शरमिंध होण्याचा प्रसग आला नव्हता. तो मोठा झाला तेव्हा मात्र एकदाच ती त्याच्या लष्करी तळावर त्याला भेटायला आली होती. पाहुण्यासाठी देण्यात आलेल्या मेजवानीच्या वेळी त्यान पाहिल होत की, ती मोठी चुणचुणीत आणि उठावदार दिसत होती. आणि मध्येंच अचानक त्यान तें सार नव्यान सुरू होताना पाहिल होत. ती भीति, तो धसका, मग अखड बडबडण...

प्रथम असच ते सहजपणें सुरू होई.. इतक की तें सुरू झालयू हें फक्त पीटरलाच कळे चिल्लर असत्य, ग्रहआग्रह यांचा जिव्हाळयान युक्त, प्रसन्न, दुलदुलीत असा वाक्प्रवाह. झपाट्यानें वाढणारा भीति वाढावी इतका जोर आणि वेग धरणारा . अशा आशयाचा— आणि त्याचा तेव्हादेखील तोच शेवट— आज सकाळी झाला तसा. पीटरनं तिला झपाट्यान कुठतरी लाब नेल.

आज आईला त्यान ग्रीनविचला नेल तेव्हा वाटेत तिला रेस्टॉरंट-मध्ये घेऊन जाण्याचा त्याचा प्रयत्न यशस्वी झाला नव्हता, तरी पण एका ठिकाणी जरा थाबून त्यान तिला कॉफी मात्र घ्यायला लावली होती. कॉफीमुळे दोघानाहि एकाच वेळी किती बर वाटल होत. कपावर ओठ टेकून, कापऱ्या मानेन तिन वर त्याच्याकडे कृतज्ञेची दृष्टि टाकली होती, आणि त्यान तिच्या घशाखाली जाणाऱ्या कॉफीला मनोमन दुवा दिला होता. नतर, पुढ मजलदरमजल करताना घराकडे निघालेल्या पाखराप्रमाण वाढणारी तिची उतावीळ त्याला जाणवली होती. तिथ तिला खूप सुरक्षित वाटणार होत. जवळ तेवढे पैसे असते आणि राहू देण्यात येत तर ती कायमचीदेखील आनदानं तिथ राहिली असती. कारण तिथ तिच्या कुत्र्याला आणि तिला मान होता, स्थान होत. तिची अपेक्षा तिथ फारशी नव्हतीच, अपेक्षा एकच की, बेचैनीच्या असल्या काळात तिथ लपता याव. त्या सगळ्या मडळीत सर्वात कमी उपद्रव तिचाच होता.

आता, ‘कॉन्व्हर्टिबल’ मोटारीच्या तापल्या ‘फ्रट सीट’वर बसल्या बसल्या, कुठ जाव याचा विचार करताना पीटरनं स्वतःला समजावल की, तेव्हादेखील आपल्या तक्रारी नव्हत्या. गाऱ्हाणी नव्हती. होत एवढच की, आपल्या वयाच्या इतराकडे, आयुष्य कस असेल याविषयी सर्वसामान्य अशी काही स्वप्न होती, अचबा होता. आणि आपल्याला मात्र केव्हापासून आयुष्याच एकाकीच ज्ञान मिळत आल. आपल्या दृष्टीन आयुष्याचा अर्थ इतरापेक्षां निराळा झाला.

वर, आकाशात निळ्याशाग रगाच एक विमान जसीच्या दिशेन घरघरत उडत चालल होत. तिकडे ‘ राय’ ला, क्लबातली तरुण मडळी निळ्या गरमागरम हवेंत, वाळूत, पाण्यात, जणू हे सारं त्याचच वाढत स्वरूप असल्याच्या विश्वासान वावरणार होती, हुदडणार होती. सध्या-काळच्या या वेळी नृत्यानतर व्हराड्यामधून अदृश्य होणार होती आणि गाड्याच्या मागल्या सीटसवर, नृत्यातली लय आणि व्हिस्कीची धुदी यानी चेतलेल्या एकमेकाच्या वासना अजमावणार होती. त्याच्या मतान ते सारे सुसस्कृत, पुढारलेले होते. युद्धाच्या नव्हे, तर त्यानतरच्या टागत्या शाततेच्या अनुभवावर पोसलेले तरुण, कॉलेजमध्ये जाणाऱ्या तरुण मुली--कॉलेजदेखील इतकी आधुनिक की डीनना सर्व वेळ आवर्जून सागाव लागे की इथ समाजहिताच आणि कुटुबहिताचच शिक्षण दिल जात.–साऱ्याना आपण उच्चवर्गीय असल्याची खात्री होती. पण पीटरन त्याच्या सस्कृतीच पढीक स्वरूप जवळून पाहिल, त्याच्या थड डोळयात अपेक्षाची लुकलुक हेरली,आयुष्यातल्या घटितअघटिताच स्वागत करणारे विलग ओठ त्यान अभ्यासले, तेव्हा मात्र त्याला त्याचा हेवा वाटू लागला होता. त्याच्याशी कस वागाव हें त्याला कळेनास झाल होत. मेजवानीच्या प्रसगीच्या पाहुण्यासारखी त्याची गत झाली होती.

आता त्यान गाडीच ‘ इग्निशन ’ चालू केल आणि गाडी घरघरू लागली. काहीतरी निर्णयाला येण्याला आपल्याला यान भाग पडाव अशी त्याची अपेक्षा होती. अलीकडे वारवार तो जात असे– गेल्या काही दिवसातच गेला नव्हता– तिथं, रॉबर्ट व्हिएलमकडे जाव अस त्याच्या मनात आल. कारण स्पष्ट होत. तिथ कुणी भेटल असत. अनेकाची अपेक्षा तिथ थाबण्यात हीच असे. क्लरमॉट ॲव्हन्यूवरच्या रॉबर्टच्या जुन्या पद्धतीच्या जागेच दार उघडताच प्रथम ध्वनि कानी पडायचा तो रगलेल्या गप्पाचा किंवा रगतदार गायनवादनाचा. विश्वविद्यालयीन शिक्षणाच्या जगात प्रत्यही जाणवणाऱ्या एकलकोंडेपणावर, निःस्तब्धते वर उतारा म्हणून इथ आणखीहि कुणी जमले आहेत असा याचा अर्थ

असायचा. विश्वविद्यालयीन शिक्षणाचं तें जग मुख्यत: मानसिक असे, अतर्मुखतेचं, व्यासगाच असे, त्यातून पळवाट आवश्यक ठरायची. पीटरच्या अनत परिचितापैकीं अनेकजण– कुणी साहित्यातले शिलेदार, कुणी कलाकारदेखील, तिथ वाट चुकल्याप्रमाण यायचे. कुठतरी जाण्याच्या अपेक्षेन यायचे. तिथ रेंगाळायचे. हेतु हा की, कुठतरी म्हणजे कुठ हें तिथ सापडेल, समजेल

रॉबर्टन मुरटया स्वरूपाचे अनेक अभ्यासक्रम पत्करलेले होते, पत्करीतहि होता. ज्याच वय अगर उत्पन्न नक्की सागता येणार नाही असे अनेक 'नॉनमॅट्रिक्युलेटेड' विद्यार्थी असल्या फुटकळ अभ्यासक्रमाच्या वाटेला जात. त्याचा उत्साह माफक तरीहि कायम असायचा आणि अमक्याच वेळेत अमुक एक अभ्यासक्रम पुरा झालाच पाहिजे ही घाईगडबडहि नसायची. त्याचे विषय नेहमी बाजूचे आणि त्याचे त्यानीच हुडकून काढलेले अतएव सशोधनाला अवघड असत. याशिवाय एका वेगळ्या प्रकारचे विद्यार्थी या प्रातात असत. ते जरा वयस्क असत. तरुण मडळीच्या उत्साहावर त्याचा पिंड पोसला जायचा, तरुण रहायचा रॉबर्टची गणना त्यात झाली असती त्याच वय चाळीस ते पन्नासच्या दरम्यानच होत. अगापिंडान तो चागला मोठाड होता. रुद फताड्या चेहऱ्यावर त्याचे तुलनेन छोटे नाकडोळे विधात्यान अदाजान बसवून दिले होते. आपल्या स्वत:च्या दिशाहीन आयुष्याचा विचार रॉबर्टला कधीच पडल्याचा दिसत नसे. त्याच्या दृष्टीन जणू, एखाद्या पदवीच्या आचरट आणि मूर्ख हेतून धपापण्याखपण्यापेक्षा अस दिशाहीन जगण हाच, 'परिपूर्ण मानवा'च्या कॅथॉलिक कल्पनेला धरून असा, जगण्याचा मार्ग होता. त्याच्यासबधात एक बोलवा अशी होती की, बोस्टनमधल्या एका धनाढ्य कुटुबापैकी तो होता. न्यूयॉर्कमध्यें तो होता तोवर या कुटुंबाकडूनच त्याला नियमितपणे खर्चाचे पैसे येत असत. परतु तो स्वतः मात्र कधींच स्वत बद्दल बोलत नसे. आणि तरीहि, आपल्याविषयी काय बोललं, कुजबुजल जात याच

कमालीच बारीक ध्यान त्याला असे. त्याचं जें काही उत्पन्न होत, त्यात भर म्हणून तो तरुण विद्यार्थ्यांना त्याची जास्तीची खोली भाड्यान देऊन तिच उत्पन्न काढी. त्याच्या खोलीतल्या साऱ्या गोष्टीत एक आवड-निवड होती, चोखदळपणा होता. भुऱ्या तपकिरी रगाच्या खोलीच, तिथला उत्तमपैकी 'रेकॉर्डप्लेअर' हें एक वैभव मानल जाई. जवळच्या भरभक्कम साठ्यातून वेंचक रेकॉर्ड्स् तो त्यावर सारा दिवसभर लावीत राही. कधीकधी त्याच्या अनुभवाच्या, भटकतीच्या चिल्लर का होईना परंतु व्यापक ठेव्यातून तो त्या सगीतावर, टेबलावरल्या एखाद्या कादबरीच्या प्रकाशन–पूर्व प्रतीवर परभाषेतली काहीबाही मखलाशी करी त्याच्या तरुण दोस्तानाहि याचा अनुभव असल्याचा, हे सर्व त्याना ज्ञात असल्याचा जो बहाणा तो करी, त्यावरच ही मडळी सर्वात अधिक खूष होती.

मोझार्टच्या एखाद्या ध्वनिमुद्रिकेवर तो म्हणे, "फॅबेलहाफ्ट! बरोबर की नाही? साल्झबर्गला त्या अमक्यातमक्यान त्या अमुक कार्य-क्रमात ही गत वाजवताना अशी मझा केली होती यार, की बस बस बस! याद है न मियाँ?" एवढ्यानच, साल्झबर्ग जन्मात न पाहिलेल्या तिथल्या पोरसवदा जिवाना मोठ धन्य वाटे,कृतकृत्य वाटे.कधी टेबलावरची एखादी कादबरी उचलून तो ती परत टेबलावर आपटून म्हणे, "ल प्लूम द मॉ ऑकल,बहुतेक! ल प्लूम द मॉ ऑकल गाइदे.एह,बिचारा गाइदे!" आणि सर्वजण मनाशी नोंद घेत की, ती विशिष्ट कादबरी वाचण्याच्या लाय कीची नाही, इतकच नव्हे, तर तिचा लेखक गाइदे याच कोणतच पुस्तक न वाचल तरी चालेल.

पीटरन गाडी 'पार्क' केली आणि रॉबर्टच्या बिऱ्हाडी तो चढला. स्वत:शीच तो खुलला होता, सोबतीसगतीच्या अपेक्षेन उमलला होता. असल्या कोंडाळ्यातल्या ठरीव बडबडीवरच तर तो लहानाचा मोठा झाला होता. या स्वतःवरच खूष असलेल्या खुज्या कलानिष्ठाच्या कोंडाळ्यात

निदान त्याला स्वस्थचित्त आणि प्रशस्त वाटत असे. रॉबर्ट तर या सर्वाहून बुद्धिमान् होता. त्याला बोलता, वावरताना पहाण्यात मौज होती. अनेकदा, तो हिरीरीनें पटवून देई त्या 'पथा'चे आपण वारकरी असल्याच्या समाधानात त्याचे 'उप-ग्रह' मश्गुल होऊं बघत, तो खुद्द रॉबर्ट दुसऱ्याच एखाद्या पथाला जाऊन मिळाल्याच आणि पूर्वीइतक्याच हिरीरीन या नव्या पथाच प्रतिपादन करीत त्याच्याकडे किंचित् कुचेष्टेन पहात असल्याच त्याना दिसे. अर्थात् त्याचा म्हणण्यासारखा उपद्रव फारसा कुणालाच नव्हता. कुणावरहि त्याचा चिरस्थायी असा पगडा नसे, दाब नसे. कारण तो स्वतःच फिरता असे. गतीचा, चचलतेचा तो उपासक होता. त्याच्या मनात काहीं दुबळेपणा, संभ्रम, गोंधळ असलाच, तर निदान तो त्याचा पत्ता कुणाला लागू देण्यापैकी नव्हता. अत्यत व्यवस्थितपणें त्यान अशा गोष्टी गुप्त ठेवलेल्या होत्या.

अधाऱ्या, कोदट 'हॉलवे'मध्यें उभ राहून पीटरन रॉबर्टच्या बिऱ्हाडाची घटा वाजवली. आणि अचानक त्याच्यावर औदासीन्य झाकाळून आल. आपल्या आईची आठवण त्याला अगदीं सहजगत्या झाली. त्याला वाटल कीं, अशी कितीतरी माणस आहेत, त्याचा आपल्यावर नाही म्हटला तरी बराच परिणाम होतो. ती आपल्यात फार मोठं बळ निर्माण करू शकत नाहीत, परतु या उणिवेची भरपाई म्हणून अनेक छोट्याछोट्या गोष्टी मात्र जाणता अजाणता आपल्याकरता करतात, बोलतात, की ज्यायोगें बर वाटत. कृतज्ञ वाटत. त्याना हे कसं साधत असाव याबद्दल पीटरला नेहमींच एक कौतुक होत.

रॉबर्टन दरवाजा उघडला. पीटरला पाहून त्याला मोठ नवल वाटलंस दिसल. बरहि वाटल. तो उद्गारला, "अरेच्चा! पीटर! हेल्लो, पीटर! अरे यार, कैसे हो आप?" शब्दापेक्षा त्याच्या भरदार आवाजात यातला सारा अर्थ साठला होता.

"ये, आत ये दोस्ता, असा आत ये!"

रॉबर्टन लिननची पाढरी हाफपॅट घातली होती, चट्टेरीपट्टेरी शर्ट पहेनला होता. या कपड्यात तो अगदी तब्येतीत वावरत होता बिऱ्हाडाच्या अंधाऱ्या हॉलमधून पीटरला घेऊन तो आत निघाला. दोन शयनगृहं माग टाकून तो त्याला घेऊन लिव्हिंगरूममध्यें आला. ती सारी जागा इमारतीच्या वरच्या मजल्यावर होती. सर्वांत वरच्या मजल्यावर ती असल्यानच, मध्यम प्रतीचा, धुरकट मद उजेड त्या जागेत वरून येई. लिव्हिंगरूम चागली प्रशस्त होती. तिच्यातल शेकोटीच बाधकाम जुनाट पद्धतीच्र आणि पाढऱ्या रगाच होत. याशिवाय तिच्यात गॅसचा लाकडी 'लॉग' आणि अनेक पुस्तक होती. इतर जागेंतून इथ आल्यावर ही खोली पाहून, येणाराला एक अनपेक्षित आनद लाभे शिवाय रॉबर्ट इथ सर्व वेळ काही दिवे जळते ठेवी, त्यामुळ केव्हाहि या खोलीला रात्रीच्या मैफलीच स्वरूप आलेले असे.

दोघे त्या खालीत शिरले तशी, जाता जाता रॉबर्टन 'रेकॉर्ड—प्लेअर' सुरू केला. आणि पहाता पहाता ती खोली सूरब्रह्मान भरून गेली. सूर-दबलेले पण प्रवाही. खोलीतून बाहेर गेल्या वेळीं आपल्या मागे निर्माण झालेली पोकळीच जणू रॉबर्टला तातडीन भरून काढायची होती. ते दोघे एका टेबलाशी बसले. त्या टेबलावर पटले होते काही नकाशे, एक उघडा नकाशासग्रह, प्रवासविषयक माहितीची काही चोपडी आणि बीअरचे रिते चषक. त्या खोलीतला सध्याचा भाडेकरू व्हिन्स आवळलेल्या मुठीवर डोक रोवून बसला होता. दुसरा एक अनोळखी कुणीतरी, हे दोघे खोलीत शिरताच आपली देखणी मुद्रा सुस्तपणें उचावून त्याना न्याहाळू लागला.

"व्हिन्स!" रॉबर्टन पुकारल, "हा पीटर बर्ज. ओळखतोस तू याला? आणि हा मारिओ ओस्ती, पीटर बर्ज."

मारियो नामक त्या गव्हाळी कातीच्या तरुणान बसल्याबसल्याच मान हलविली आणि स्मित केल व्हिन्सनहि मुद्रेवर ओळख दर्शविली. तथापि त्याचे लाल कडाचे तारवटले, धुद डोळे पीटरपलीकडे कुठंतरी पोचले होते त्याला या नवागतापेक्षा तस पहाणच पसत असावं.

"अबे यार! काय उकाडा होऊन राह्यला आहे!" रॉबर्ट उद्‌गारला. 'थाब, तुला बिअर पाजतो." मारिओला उद्देशून तो उभ्याउभ्या वाकला. त्याचा रिता चपक त्याने एकीकडे कुरवाळला.

मारिओ खुर्चीत आणखीनच पसरला. वर, रॉबर्टकडे पहात त्यान पेंगुळली मान नकारार्थी हलवली. जांभई दिली, आळस देण्यासाठी हात ताणले आणि ते खाली पडूं दिले. मग तो म्हणाला, "त्यान आणखीच उकडेल." खूप देखण्या माणसात असतो तसा त्याच्यात एखाद्या जनावरासारखा सुस्तपणा भरला होता. त्याच्या तोंडून शब्द आला म्हणजे तो एक चमत्कार वाटायचा.

रॉबर्ट आता लगबगीन स्वयपाक खोलीकडे गेला.

"रॉबर्ट!" व्हिन्सन त्याला त्याच्या हलक्या, ओढल्या आवाजात हाकारल. "मलाहि ड्रिंक आण. बिअर नको, ड्रिंक आण." गालफडावरचे दाढीचे खुट त्यान टोकदार नखान करकरा खाजवले. त्याच्या गोल वाटोळ्या मस्तकावर आणि अपऱ्या चेहऱ्यावर त्या खुटानी एखाद्या अकाली प्रौढ झालेल्या अर्भकाचा भास निर्माण केला होता. जवळून पाहिल तर मात्र, तो अर्भक वगैरे कधीहि नसावा आणि सध्याच्याच वयाला तो अंड्यातून बाहेर आला असावा, अस वाटत होत. तो वाढू नये, आहे असाच टिकावा, अशीहि काही व्यवस्था असावी असहि वाटत होत. हुबेहुब रॉबर्टसारखी पांढरी अर्धी तुमान त्यान घातली होती. रॉबर्टच्या तपकिरी नि पांढऱ्या रंगाच्या शर्टाची छोटी आवृत्ति, असा निळ्या–पांढऱ्या रंगाचा शर्ट पहेनला होता. ते दोघे मिळून जणू एक 'सच' तयार होत होता. समुद्रकिनाऱ्यावर मुल एकच पोषाख दोघात घालीत त्याची आठवण पीटरला झाली.

"मी घरात व्हिस्की ठेवीत नाही, आहे माहीत तुला." रॉबर्ट येता येता म्हणाला. त्यान तीन चपक एकावर एक मोठ्या शिताफीन तोलून

धरले होते, आणि येताना खोलीभरची छोटीं छोटी टेबलं तो आपल्या रुंद ढुंगणानिशींदेखील कौशल्यानं टाळीत होता. "कुठ घेतली असशील तिथ चागली पोटभर मिळालीय् बाकी तुला." पीटरला स्मरलं की, रॉबर्ट म्हणाला तें खर होत. समारभातच वैशिष्ट्यान दिसत तीं ड्रिंक्स त्याच्याकडे हमखास असत. 'काफे ब्रुले' किंवा हेमतांत 'माइबॉल.' तें घेत घेत मग तो ते आपण कस हिकमतीन मिळवल त्याची पराक्रमयुक्त कहाणी मोठ्या रुचीन सागायचा. पण खरं म्हणजे इथली धुदी असायची आपला नव्यात नवा मुखवटा मिरवण्याची. ही धुदीच 'चढायची.' भोवताली इतर माणसहि आपल्याच प्रकारची म्हटल्यावर तर या धुदीला एक आगळी तार असे.

पीटरन आपला चषक उचलला. तो म्हणाला, "तुम्ही अन् व्हिन्स म्हणे मोरोक्कोला जाताहात?"

"मोरोक्को?" रॉबर्टनं बिअरचा एक दीर्घ घुटका घेतला. "नव्हे नव्हे, तो बेत बदलला. तू पुष्कळ दिवसात फिरकलाच नाहीस नव्हे का इकडे? हा मारिओ सध्या माझी इटालियन भाषा साफसूफ करून घेतोय्. परवां रोमला चाललोय् आम्ही."

शिंगाच्या मोठमोठ्या आवाजात 'रेकॉर्ड–प्लेअर'वरची शेवटची रेकॉर्ड सपली. रॉबर्ट रेकॉर्ड्सची नवी चळत निवडून रचत होता. तोवरच्या स्तब्धतेंत पीटरला व्हिन्सच नख त्याच्या गालफडावरून खरखरा खरखरा फिरताना ऐकूं येत राहिल. अजूनहि खुर्चीतच मागे रेलून मारिओ ओठानी धुराच्या वेगवेगळ्या आकाराच्या सुरनळ्या बाहेर सोडीत होता. ते ओठ जाड होते, लवचिक होते. ते जणू धुराची अशी वलयं सोडण्यासाठी, चागलेचुगले पदार्थ चाखण्यासाठीं, अन्य एखाद्या ओष्ठद्वयाची रुचि घेण्यासाठीच घडले होते.

पीटरन त्याला विचारल, "तुम्ही तिथ स्टडबिडीसाठी जाणार आहांत वाटतं?"

"पेट." मारिओन ओठ नव्या पद्धतीन वळवून धुराचा नवा लोट सोडला.

रेकॉर्ड-प्लेअर चालू करीत रॉबर्ट म्हणाला, "छट्! आफ्रिकेंत आता काहीं दम राहिला नाही." आता 'रेकॉर्ड-प्लेअर'वर एक ततुवाद्य वाजू लागल. त्याचे सूर पोकळ होते, पण चपखल होते. रॉबर्टन आपला आवाज त्या वाद्यसंगीतावर थोडासा चढवला." फॅशन फोटोग्राफर्सच्या झुंडी, आणि उदयोन्मुख का काय ते लेखक." त्यान गालफडं आत ओढली आणि चेहरा आबट तुरट केला. "आफ्रिकेच्या जगलांत नशीब काढण्यासाठी येऊन वासनेची चऱ्हाट वळणारे."

"हूं. बिचारी आफ्रिका!" पीटर उद्गारला.

रॉबर्ट हसला. रुक्ष, सुरकुतल्या डोळ्यानी व्हिन्सन त्याच्याकडे नुसतच पाहिल. पीटरन त्या एकाहून अधिक छटा दाखविणाऱ्या चेहऱ्याकडे सराईत नजरेन पाहून मनाशी म्हटल की केवळ मद्यपानाचा हा परिणाम नव्हेच एकूण. आणि त्याला जाणवल की, आणखी एका चेहऱ्याशीं आपण या चेहऱ्याची तुलना करतो आहोत. नुक्ताच दूर राहिलेला चेहरा. त्याने तिसरीकडे नजर वळवली.

रॉबर्ट आता रेकॉर्ड-प्लेअरवर रेलून विचारू लागला, "तू जाणार होतास ना, कुठ तरी, पीटर?"

"यदा नाही." या शब्दानी मनात उठलेली वेदना पीटरन कटाक्षान शब्दाबाहेर ठेवली. ग्रीनविचमध्ये कितीतरी फरसबदी वाटा होत्या. साऱ्या नितळ. आणि दुतर्फा फक्त रिती कुपण वागवणाऱ्या. झाडाची जागा जणू ही कुपण भरून काढीत होती. "लॅडोव्स्काची रेकॉर्ड ना ती?"

"हू. या उष्म्यात गारीगार लागते कानाला. डोक्यातल्या किड्यावरहि चागली." रॉबर्ट व्हॉल्युम-कट्रोलशी चाळा करीत म्हणाला. संगीताचा आवाज वाढला, मग उतरला. "व्हिन्सन त्याबद्दल माग एक कविता केली होती. मोझार्टबद्दल होती मला वाटतं ती.— होय ना रे

व्हिन्स?" 'अ लव्हली क्लॉक बिटविन अवरसेल्व्हज़ ॲंड टाइम...' जिभेनें शब्द तोडीत रॉबर्ट तो चरण म्हणत राहिला.

"बद कर पाहू!" व्हिन्स जागचा ताड्दिशी उभा राहिला. त्याच्या हाडकुळ्या मुठी घट्ट वळल्या होत्या, हात दोन्ही अगाना टाग-ल्यागत होते.

"नको. पूर्ण होऊ दे." रॉबर्टन मुद्दामच वळून रेकॉर्ड-प्लेअरच झाकण बद केल. सुईचा मद खरखराट ऐकू येईनासा झाला. मूळचे हळवे, लयबद्ध सूर अधिकच स्वच्छ ऐकू येऊं लागले. रॉबर्ट हसला. "लेखकाची जातच काळामाग नादावलेली. मारिओला मात्र जाडी, खोलीचि सोयरसुतक नाही."

"पोर्ट्रेट्स् पेट केली तरच बाळगाव लागेल." मारिओ उद्गारला. त्याच्या विलग ओठामधून त्याचे शुभ्र दात, बुद्धीच्या अनपेक्षित झलके-सारखे चमकले.

रॉबर्ट हळुवार शब्दात म्हणाला, "दॉल्स फार निएत." मग स्वप्नाळू आवाजात त्यान वारवार ते शब्द हलके हलके उच्चारले. पीटरच्या चित्तात, यान त्याला अर्धवटच माहीत असलेले 'लॉग्गि' 'पॉत व्हेक्किओ' 'लुगार्नो' हे इटालियन शब्द एकेक करून चागलेच रुतले, आणि फ्लॉरेन्सच्या सोनेरी प्रकाशात मनान तरळणारे मारिओ आणि रॉबर्तो त्याच्या कल्पनेसमोर अनेक अस्पष्ट, धूसर नगरातून हिंडू लागले.

व्हिन्सच्या तोडावाटे आता एक दबला उद्गार उमटला. तो रेकॉर्ड-प्लेअरकडे झेपावला रॉबर्टनं त्याच मनगट पकडल. झाकणावर घट्ट दाबून ठेवल. दोघे तसेच एकमेकाना जखडून राहिले. एकमेकावर नजर रोखून राहिले आणि दरवाज्यावरची घटा खरखरली.

"सुसान असणार." रॉबर्ट म्हणाला. त्यान व्हिन्सचा हात सोडला आणि आपला पजा ताणून, बोटात भरणार रक्त तो पहात राहिला.

पुन्हा एकवार एक दबला उद्गार काढून व्हिन्सन ठोसा

लगावण्याच्या वेड्यावाकड्या प्रयत्नात मूठ पुटे भिरकावली. रॉबर्टच्या गालफडावर ती कशीबशी बसली, घसरत खाली आली. रॉबर्टच्या गालफडावर एक बारीक लाल रेघा उमटली. तोंडावर मूठ धरून हिंस्र क्षणभर उभा राहिला, आणि मग तो खोलीतून झपाट्यान निघून गेला नजीकच्या निजण्याच्या खोलीचा दरवाजा धाड्दिशी लागल्याच ऐकू आल, लॅचहि लागलेली समजली. पुन्हा एकवार घटा खरखरली. र्‍हस्व, चाचरती खरखरली.

रॉबर्टन हात एकदा गालफडावर मारून घेतला, खादे उडवले आणि तो खोलीतून निघून गेला.

मारिओ आता त्याच्या खुर्चीतून प्रथमच उठला. "सुसान कोण ते विचारणार नाहीयूस वाटत तू?" त्यान पीटरला विचारल.

"विचारायला हव?" रेलून जवळ आलेल्या, हर्षान सुरकुतलेल्या, मारिओच्या मुद्रेपासून लाब होत पीटरन विचारल.

"त्याची मुलगी." मारिओ हलक्या आवाजात म्हणाला. "आपली मुलगी येणाराय् अस म्हणत होता तो. आहे की नाही? कल्पना येते? रॉबर्टची मुलगी!"

अगदीं नजीक आलेल्या त्या हलत्या चेहऱ्यापासून आणखी लाब होत पीटर खिडकीशी गेला. धुळीन भरलेल्या अंगणातला तपशील अभ्यासू लागला. प्रकाशलेल्या खिडक्याची एकच एक उभी रेघा. प्रत्येक खिडकीवाटें जिन्याच्या काही पायऱ्या दृग्गोचर होत होत्या. पाचहि मजल्यातून हा जिना गेलेला. बाकीच्या बहुतेक खिडक्या मद प्रकाशल्या होत्या, बद होत्या. क्वचित् त्यातल्या काही, काही अगुळ उघडलेल्या होत्या. चौक निमर्नुष्य होता. माणस बाहेर गेली असावीत, किंवा अधिक उजेडाच्या दिवाणखान्यात जेवणासाठी पोषाख करीत असतील: सारी त्याच्या जीवनाची ही अधारी मागली बाजू शक्य तितकी टाळीत असतील. किंवाइकडे तिकडे कुठेंतरी कुणीतरी

अधारत्या खोलीत एकटच बसून राहिल असेल, कुणी बिछान्यात, उशीत तोंड खुपसून निपचित पडून राहिल असेल. उजवीकडली, काही फुटा-वरची, कोपऱ्यावरची खोली, व्हिन्स गेला होता ती खोली असावी. तिच्यात उजेड नव्हता.

रॉबर्ट परतला. त्यान गालफडावर 'क्लीनेक्स' धरला होता. त्याच्या-बरोबर निळ्या झग्यातली भुरभुरत्या केसांची एक मुलगी होती. तिच्या निळ्या झग्याच्या दोन्ही खांद्यावर एकेक लाल बाण भरलेला होता. रॉबर्टन दुसरा दिवा लावला. यानतर आता कुणी आल तर हा रॉबर्ट खात्रीन व्हेल्व्हे-टचा एखादा पडदा त्याच्या स्वागतार्थ पायघडी म्हणून धरणार किंवा पडघमची सलामी 'रेडसील'ची रेकॉर्ड लावून त्याला देणार, अस पीटरला त्याच्याकडे पहाताना वाटल. रहस्यानी भरलेला एखादा कप-ड्याचा 'वॉर्डरोब' अखेर उघडतो आणि त्यातला हाडाचा सागाडा बाहेर येतो— ही मुलगी, मारिओबरोबर आताच हातमिळवणी केलेली आणि आता आपल्यापुढे हात धरलेली, तिच्याकडे पहाताना असंहि पीटरच्या मनात आल. तिन जरा चाचरत, बुजरेपणान पीटरपुढे हात धरला होता. जणू अशा तऱ्हेन हातमिळवणी करण्याची तिला सवय नव्हती, पण आज मात्र ती शक्य ती प्रत्येक रीतभात पाळणार होती.

"हाउ डु यु डू?"

"हाउ डु यु डू?" पीटरन म्हटल.

क्षणभरच त्यान हाती धरला तो हात छोटा होता, बालिश होता. नखं बिनरंगवलेली होती. पण तिचा बाकी एकूण नूर मात्र पहाणाराची नजर तृप्त करणारा होता. मासिकाच्या मुखपृष्ठावर येतात तसल्या एखाद्या चित्रासारखी ती दिसत होती. ही चित्र—एखाद्या खांबाला टेकून उभी किंवा बसती असलेली सुंदर तरुणी, तीनचतुर्थांशाच चेहरा दिसेल अशा खुबीनं बसलेली, जणू पुरत्या दर्शनान कुणाची दृष्ट लागू नये म्हणूनच! मोकळ्या हातात तिन धरलेली लाल 'ड्रेसिंग केस' मारिओन आपल्या-

कडे घेतली, तिन खाली टाकलेले पाढरे हातमोजे उचलण्यासाठीं तो वाकला आणि ते त्यान जरा जादाच अदबीन तिच्या हातीं ठेवले. ही आदब इतकी जास्त झाली की वेटरच्या आदबशीरपणासारखी ती पीटरला वाटली. हातमोजे झटकीत ती सोफ्यावर बसली.

"गाडीत असला धुरळा होता आणि गर्दी तरी केवढी!" ती रॉबर्ट-कडे बघून थोडसच हसली. इतर दोघाकडे तिन तेवढ्यात चोरटे कटाक्ष टाकून घेतले आणि हातमोजे साफ करण्याच्या मिषान ती अधोमुख झाली. कुणीतरी काहीतरी म्हणाव तशी ती मध्येंच हातातलं काम थाबवून स्तब्ध होत होती, पुन्हा हातमोजे साफ करू लागत होती.

"हू. तर कस काय?" रॉबर्ट काही न सुचून अखेर म्हणाला. तसा वागायला तो एरवी मोठा सफाईदार माणूस होता, पण मन त्यात नसेल तेव्हा यान्त्रिकपणे ही सफाई जमावी इतका मात्र तो निढावलेला नव्हता. तो खोकला, खाकरला, पज्याच्या पाठीन त्यान गालफड चोळली, मग त्या पज्याकडेच तो पहात राहिला, आणि हातातला 'क्लीनेक्स' त्यान आपल्या अर्ध्या तुमानीच्या खिशात सारला. "कॅंप कसा काय झाला?" त्यान विचारल.

मारिओच्या भुवया उचावल्या. त्या मुलीच वय विशीच तरी खात्रीन असेल अस पीटरला वाटल.

"चागला झाला की." ती म्हणाली. रॉबर्टकडे पाहून पुन्हा ती तिच ते बाधल्या तोडाच मोजक हसू हसली. आणि मग तिन माडीवर नजर खिळवली. "मुलाच करायला मला आवडत. मुलाच्या दृष्टीन उपयोग होऊ शकेल त्या अनुभवाचा." तिन हातमोज्यावर हात ठेवले. मग ते सरकत हातमोज्याखाली गेले.

रॉबर्ट खुर्चीत बसत म्हणाला, "सुसान मुलाच्या एका कॅंपवर काम करायला गेली होती. तो कॅंप लौकर सपवावा लागला. पोलिओच्या साथीची अफवा पसरली ना."

तोच पुढें बोलला, " मी इथ नाहीं तोवर, कॉलेज उघडेस्तोंवर व्हिन्सची खोली हीच वापरील."

"अय्या!" तिन पीटरकडे बघितल. "तर मग तुम्ही व्हिन्स नाहींत?"

"छेः! मी आपला सहज आलो होतों. मी पीटर बर्ज."

तिन ओळख पटल्याचं दर्शक म्हणून किंचित् मान झुकवली. "बर झाल बाई! कारण मला खर म्हणजे कुणाची गैरसोय करण—"

रॉबर्टन मध्येंच विचारल, "रेनोमध्यें तुझ्या आईशी गाठ पडली की नाही तुझी?"

"उं हू. अस मध्येंच तिला यायला नाहीतरी जमलच नसत. आणि ऑर्थरनं बहुतेक इकडल घर सोडलं असावं. फोन चालू नव्हता त्याचा."

उगीच किंचित् हंसून रॉबर्ट खुलाशादाखल पीटरला म्हणाला, "ऑर्थर हे सुसानचे सावत्र वडील. नबरचे तीनचे, मला वाटतं. की चार ग, सू?"

जागची न हलताच सुसान काढता पाय घेऊ लागली. पुन्हा एकवार, पहाणाऱ्याच्या दृष्टीनं, खांबाला टेकलेली तीनचतुर्थांश चेहऱ्याची सुंदर तरुणी शिल्लक उरली. अपऱ्या नाकाची, मुलायम केंसाची, हिशेबी कौशल्यान निम्म्या चेहऱ्यावर प्रकाश टाकलेली.

"तीन." ती म्हणाली. मग हातमोज्याखालचा एक हात हळूच बाहेर आला आणि तिनं बोटाच नख दातानी कुरतडायला सुरुवात केली.

रॉबर्ट हें पाहून म्हणाला, "काय ग! अजून आहेच वाटतं तुला ही संवय!"

मारिओ म्हणाला, "बाप म्हणून मोठा चागला आहेस बघ तू रॉबर्टो."

ती लाजली. दाताखालच नख काढून तिन हात पुन्हा पूर्ववत् मांडीवर विसावला. हातमोज्याखालील बोट लपवली. पीटरवरची नजर तिन मारिओवर नेली आणि परत पीटरवर आणली. ती म्हणाली, " तर मग तुम्ही व्हिन्स नव्हे तर. तुम्ही नसाल अस वाटलच होत मला."

दिव्याभोवती अधाराची दाट वीण पडली. पीटरमार्गे, घराची मागली बाजू आता दिव्यानी उजळली होती, खिडक्याचीं तावदान वर गेली होती आणि नळ वहाताना ऐकू येत होते

" मला वाटत, व्हिन्स झोपला. त्याला उठवून पाठवायला हव. " रॉबर्ट खादे उडवून म्हणाला आणि जागचा उठला.

" नको ! कुणाची गैरसोय माझ्यापायी झालेली नकोयू मला. " सुसान म्हणाली. तिच्या सुरातली माफक भीति हेंच सागत होती की, अस काहीतरी याआधी बऱ्याचदा झाल असाव.

" छे. छेः ! उलट सोयच होणारायू." रॉबर्ट म्हणाला. त्यान स्मित-पूर्वक आपले हाताचे पजे पसरले आाणे तो हॉल ओलाडून आत गेला. सर्वांना त्याच दार खडखडवण ऐकू आल. मग रॉबर्टचा आवाज.

नतरच्या त्रिकोणी शाततेत मारिओ पीटरपलीकडे गेला आणि त्यान खिडकीचं तावदान वर सारल. ऐकण्यासाठी तो बाहेर वाकला, उजवीकडल्या खिडकीकडे कान देऊन ऐकु लागला. मग बाहेर काढलेल डोक पुन्हा आत घेताना त्यान खाली पाहिल. खिडकीच्या चौकटीवरची त्याची पकड अचानक घट्ट झाली. अत्यत सावकाश मग त्यान डोक आत घेतलं आणि तो सरळ उभा राहिला. त्याच्यामागें पत्र्याचा व्हेण्टि-लेटर आतल्या बाजूला खडखडत आला आणि जमिनीवर पडला. दिव्याच्या मद उजेडात मारिओचा अतिशय प्रमाणबद्ध चेहरा जणू सगमरवरी झाला होता. सुन्न होऊन कसातरी हलत होता. घेरी येत असल्या-सारखा मारिओ थोडासा लटपटला.

" मी जातो जरा इथून बाहेर. "

खोलीबाहेर तो वेगान जाताना त्याचा जड श्वासोच्छ्वास सर्वांनी ऐकला. जाताना त्यान बाहेरला दरवाजा धाड्दिशी लावून घेतला त्याचा आवाज, रॉबर्ट पलीकडे खोलीच दार धडधडवीत होता त्याच्यात बेमालूम मिसळला रॉबर्ट दारावर जास्त जास्त जोरान धडका मारीत होता.

" खाली काय दिसल त्याना ? " पीटरशेजारी येत सुसानन विचारल एरवी त्याला तिचे हे शब्द ऐकूच आले नसते त्यानी एकमेकाचा हात पकडला एखाद्या आकुंचित पाय-पुलावर दोन नवख्या माणसांनी एकमेकाना आधार द्यावा, वा उंच कड्याच्या टोकावर दोन जिवानी तोल सावरण्यापेक्षा आपापल्या मनाची चमत्कारिक ऊर्मि रोधण्यासाटीच एकमेकाना बिलगाव तशी ती दोघ एकमेकाना बिलगली हळूच डो बाहेर काढून खाली पाहू लागली हो, चौकात साकळलेल्या छाये- चट्टेरीपट्टेरी शर्ट ओळखू येत होता तेवढाच दिसू शकत होता

जणू दोघ अड्यान्या कवचाचीच बनवली आहेत, काळजी पूर्वक काहीतरी हालचाल केली तर अद्यापहि दोघाना सर्वनाशापासून वाचवण शक्य आहे, अशा तऱ्हेन दोघ माग सरली ताठ उभी झाली मागे रॉबर्ट उभा होता त्याच्या चेहऱ्यावर तोच भयकर प्रश्न उमटला होता

आणि मग घादल, धावपळ— सेटल्यूकमधून ॲम्ब्युलन्स बोलावली, पोलिसाची गस्तीची गाडी येऊन पोचली, दोघे डिटेक्टिव्ह आले, आणि अखेर पोलिसाचा प्रमुख येऊन पोचला. तेलकट त्वचेचा, तळघरात रहाणाऱ्या माणसासारखा चालणारा असा हा मचूळ माणूस होता मनगटाभोंवतालच्या कड्यातल्या किल्ल्या तो पज्याने कुरवाळत होता बरेचदा प्रयत्न केल्यावर त्यान अखेर निजण्याच्या खोलीचा दरवाजा उघडला. आत सामसूम होती. खोलीच स्वरूप अगदी सौम्य होत. बिछाना उस्कटलेला होता. खिडकी उघडी होती. दरवाज्याशी जमलेल्या माणसाच्या दृष्टींतन मात्र त्या खोलीला एखाद्या रहस्यपूर्ण नाटकातल्या खोलीच स्वरूप तेवढ्यापुरत आल होत

मध्यरात्रीनंतर, अहोरात्र उघड्या रहाणाऱ्या एका हॉटेलात पीटर आणि सुसान, दोघच बसल्या होती तोल ढळलेल्या मनाच्या अति उतावीळाने रॉबर्ट पोलिसचौकीवर, घडल्या प्रकाराचा तपशील नोंदविण्यासाठी त्या दोघा डिटेक्टिवाबरोबर गेला होता ओहिओमधल्या व्हिन्सच्या नातवाईकाना एकदा मार कळवाव असहि त्याच्या मनान घेतल होत या गडबडीत अजाणतेपणी त्यान सुसानला पीटरकडे सोपवल होत पीटरची मनची इच्छा अशा प्रकारे सफल झाली होती वडिलाची गडबड, धादल पाहिल्यावर, त्याच मन थाऱ्यावर नाही अस पाहिल्यावर, सुसान मुकाट्यान पीटरबरोबर निघाली तिला त्या वागण्याचा अर्थ कळत नव्हता आणि त्याबद्दल काही करणहि तिला शक्य नव्हत तेव्हा ती आली

"बर झाल बाई, इथ आलो आपण मला तर भारी भूक लागली होती" ती मागे रेलली. कपाळावरच्या बटेशी चाळा करू लागली

"म्हणजे तुम्ही उपाशीच होतात?"

"गाडीत सँडविचेसशिवाय काही मिळालच नाही जेवणाचा तर प्रश्नच नव्हता"

"सिगरेट ओढता?"

"हो, पण आता फार दमले आहे मी एखाद्या हॉटेलमध्ये राहिले मी तर कस वाटत तुम्हाला? म्हणजे आर्थरकडे जाण अशक्य आहे म्हणून म्हणते."

पीटर म्हणाला, "आमच्याजवळच एक छोट हॉटेल आहे त्याच्या चालकाशी ओळख आहे माझी किंवा मी म्हणतो आमच्याकडेच का येत नाही तुम्ही? माझ्या आईची खोली वापरा रात्रीपुरती किंवा तुम्हाला रहायच असेल तेवढे दिवस राहिलात तरी तशी हरकत नाही"

"आणि तुमच्या आई काय म्हणतील?"

"ती घरी नाही. काही दिवस तरी ती परत यायची नाही."

"म्हणजे रेनोमध्यें तर नाहीत ना त्या?" सुसानच्या आवाजात किंचित् कर्कशपणा आला, निबरपणा आला. सकोची माणसाच्या जिव्हाळ्याच्या अभिव्यक्तीत कधीं कधी येतो तसा होता तो.

"उ हू माझे वडील मी आठ वर्षांचा असताना गेले. पण का विचारलत तुम्ही?"

"उगीच. तुमच्या बोलण्यावरून वाटल झाल मला. शिवाय तुम्हीदेखील खूप 'हे' वाटलात मोठ्या कुटुबातले! आई कुठ नोकरीबिकरी करतात का तुमच्या?"

"छे:! बाबानी माग काही ठेवल होत, त्यावर चालत. तुमची आई नोकरी करते?"

ती उठून उभी राहिली. चुरगळलेले हातमोजे तिन उचलून घेतले. "नाही." ती म्हणाली. तिचा आवाज आता पुन्हा एकवार अस्पष्ट आणि हलका झाला होता. "ती लग्न करते." ती झटक्यानं वळून त्याच्या पुढें चालूदेखील लागली.

पीटरन बिल चुकत केल आणि तो रेस्टॉरटबाहेर धावला. त्यान तिला गाठल.

तो म्हणाला, "मला वाटल की तुम्ही गुगारा दिलात मला."

काहीं न बोलता ती गाडीत चढून बसली.

पार्कमधून गाडी निघाली, ईस्ट सेव्हण्टीजवरच्या, सुसानन दिलेल्या पत्त्यावर निघाली. गॅस मिसळलेल्या हवेला गवताचा पुसट गध होता. पार्क कसा सुनासुना आणि ओकाबोका वाटत होता. दिवसाची दगदग जणू त्याला जास्त झाली होती. सेव्हण्टी सेकड स्ट्रीटच्या स्टॉप सिग्नलशीं म्युनिसिपालिटीच्या दिव्याचा झगझगीत उजेड गाडीत पडला.

"आमच्या घरी यायला मी सुचवल तें चुकल का? कदाचित् तुम्हाला तें गैर वाटलं असेल."

" तस काही नाही. "

सिग्नल बदलला. गाडी पुढे सटकली.

दुतर्फा शोभिवत बगल्या असलेल्या एका काळोख्या वाटेला पीटरन गाडी रोखली ही सडक अजूनहि अगदी एकीकडली आणि निवात होती हिवाळ्यातन्न इथल जग जाग व्हायच, झगमगायच. उन्हा ळयात या सडकेला सुस्ती चढायची, दिवसा ही पेंगत असायची, रात्री स्वप्नाच्या दुनियेत रगल्यागत निवात असायची--चुकून कुठें आतल्या भाडेकरूचा किणकिणता वापर जाणवायचा! नबर चार मध्ये तूर्त काळोख होता.

सुसान म्हणाली, " तशी काही अडचण नसेल तर तुमच्या घरीच राहीन मी. " तिचा सूर सहजपणा सुचवीत होता, चुणचुणीत होता. " हॉटेल्सचा कटाळा येतो मला वीट येतो. अधूनमधून कितीदातरी हॉटेलमध्ये राहिलो असू आम्ही "

" चला. प्रत्यक्षच पाहू आपण. "

फाटकापुढल्या आवारात दोघ शिरली. माग गाडीचा दरवाजा आपोआप एक पोकळ आवाज करून बद झाला. सुसानन पर्समध्यें शोधाशोध केली आणि एक किल्ली बाहेर काढली. तिचा उपयोग होणार नाही हें आधी माहीत असूनहि काढली. पीटरच्या लहानपणी, या बगलीसमोरच्या आबारात तो उभा होता तसा जुन्या बगल्यासमोरच्या आवारात उभा राहिला होता, घोटाळला होता. कोपऱ्याकोपऱ्यातून तेव्हाहि आतासारखाच मदसा कुजकट वास दरवळत होता. लोखडी फाटक आणि कुपण तेव्हाहि आतासारखच गजलेल, वाकलेल, डागळलेल आणि जागच अर्धवट उखडलेलं होत. त्याचे दाते मोडलेले होते. या बगलीच आवार नितळ फरशीन नव्यान जडवलेल होत. रात्र दमट होती, पण कसला गध--वास नव्हता. तेलकट, तुकतुकीत आणि कुलपबद लोखडी गजाची जाळी बसवून दारखिडक्या सुरक्षित करण्यात आल्या होत्या. दारासमोरच्या

जाळीला एका प्राटेस्टान एजन्सीचा चौकोनी जाहीरनामा नीटसपणे चिकटवला होता

"कुलुपाची चावी आहे का तुमच्याकडे ?"

"उहू" ती बाहेर हिरवळीवर उभी राहून बगलीकडे पहात म्हणाली, "त्या तिथ माझी खोली होती छान होती. अशी कधी मला मिळाली नव्हती इतकी छान होती" ती गाडीकडे आली आणि आत चढली

तो तिच्या मागोमाग गाडीपाशी आला आणि तिच्या शेजारी चढून बसला. तिन डोक हातानी घट्ट धरल होत

"वाईट वाटून घेऊ नका. सकाळी कुणाला तरी गाठू आपण"

"वाईट ? मला नाही वाटत खरच नाही वाटत. काहीएक वाटत नाही मला त्याबद्दल." ती नीट बसली चेहरा तिसरीकडेच करून बसली. "कशाचबद्दल माझे आईवडील किंवा त्यानी ज्याच्याशी संबध जोडले ती कुणी, कुणाहिबद्दल मला वाईट वाटत नाही" दारावरची कळ तिन हळूच फिरवली, मग उलट केली

"रॉबर्टबद्दल मला नाही वाईट वाटत की आईबद्दल. आणि आर्थरबद्दल तेच अर्थात् तो तसा गमत्या होता तें सोडा अगदी व्हिन्स-बद्दलसुद्धा मला काहीएक वाटत नाही त्याची फार ओळख नव्हती ती झाली असती तरी काही वाटल नसत मला"

"तो मुळातच जरासा चमत्कारिक पोरगा होता कुणाच्या तरी खिडकीतून तो कधी तरी हेंच करणार होता"

"नाही" ती ताड्दिशीं वळली आणि सामोरी झाली "तरीहि मला त्याची काळजी करायला आवडली असती."

त्यानं तत्काळ यावर उत्तर केल नाही हे पहातांच तिन त्याच्या पाठीवर हलकीशी चापटी मारली आणि ती माग रेलून बसली. "मनावर घेऊं नका बर का काहीं. माझ डोक थाऱ्यावर

नाही " ती वळली आणि आपल्या कोपरावर तिन मस्तक विसावल अस्पष्ट शब्द आले, "ठिकाण आल म्हणजे उठवा मला "

त्यान्त घर येईतोवर ती गाढ झोपली होती त्याच्या स्वतःच्या खिडकीखाली त्यान फारसा आवाज होऊ न देता गाडी उभी केली आयुष्यात कधीच त्याला एवढी जाग, एवढ चैतन्य जाणवल नव्हत. तिच्याबरोबर आता तो रात्रभर बसून राहिला असता ती तशी गाढ झोपलेली आणि तो जागा तिच्या सहवासात, किंवा हव तर समवयस्क अशा कुणाच्याहि सहवासात, राह्यला आपण असतो तर, किंवा कुठहि असतो तर, केवढी मजा आली असती अस त्याला वाटल दोघाच वय एकसारख मग तें किती का असेना, त्याच्यासारख्या दोन माणसाच वय किती असल तरी सारख असणच महत्त्वाच होत यानतर तिच्याकडे काही काही म्हणून न सागण्यासारख उरल नसत

उत्तरेकडे, घराच्या छपराच्यावर, गावाच्या ऐन वस्तीतल्या विजेच्या झळाळीन आभाळातल्या चादण्या निस्तेज झाल्या होत्या पण त्याच तिकडे लक्ष नव्हत उद्या तो तिला गाडीतून फिरायला नेणार होता– हवा कशीहि असती तरी नेणार होता ग्रीनविचच्या आसमतात पुष्कळ चागले रस्ते होते.

—★★★★★★★★★★—